


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



# ❀ विनम्र आवाहन ❀

## लेखक/ वाचक म्हणून मोफत नोंदणी करा.

## मसापच्या संकेतस्थळाला भेट द्या.

**www. masapapune.org**

मसापशी सोशल मीडियावर जोडून घ्या.

**facebook.com/ masapapune**

**twiter.com/ masapapune**

**bit.ly/ youtubemsp**

**मसापच्या व्हॉट्सॲप ग्रुपला जॉईन व्हा.**

**८४४६८०६८०६**

**या व्हॉट्सॲप क्रमांकावर Join MASAPA असा मेसेज पाठवा.**

**महाराष्ट्र साहित्य परिषदेने संकेतस्थळाबरोबर सोशल मीडिया आणि आधुनिक तंत्रज्ञानाचा परिणामकारक वापर करून लेखक आणि वाचक यांच्याबरोबर सतत संपर्कात राहण्याचे ठरविले आहे. परिषदेचे विविध उपक्रम, निमंत्रणे आणि अद्ययावत माहिती लेखकांना आणि वाचकांना मिळावी यासाठी मसापच्या संकेतस्थळावर मोफत नोंदणी सेवा सुरू केली आहे. आपण स्वत: प्रत्येकाने नोंदणी करावी. तसेच आपले लेखक आणि वाचकमित्र यांनाही याबद्दल माहिती सांगून त्यांना नोंदणी करण्याची मसापच्या वतीने विनंती करा.**

**आपल्या या खारीच्या वाट्याने मसापचे उपक्रम सर्वदूर पोहोचायला मोलाची मदत होईल.**

अनुक्रमणिका

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक क्र. ३५६, जुलै ते सप्टेंबर २०१६







प्रकाशक

**प्रकाश पायगुडे**
प्रमुख कार्यवाह




**महाराष्ट्र साहित्य परिषद**
टिळक रस्ता, पुणे ४११०३०. दूरभाष : ०२०-२४४७५९६३
संकेतस्थळ : www.masapapune.org
ई-मेल : masaparishad@gmail.com
(कार्यालयाची वेळ : स. ९.३० ते १२, दु. ४.३० ते रा. ८)



अनुक्रमणिका









◆

मुद्रक-प्रकाशक
**प्रकाश पायगुडे**
प्रमुख कार्यवाह
महाराष्ट्र साहित्य परिषद,
टिळक रस्ता, पुणे ४११०३०.

◆

संपादकीय संयोजन
**संदीप खाडे**

◆

अक्षरजुळणी व सजावट
**आर्ट ॲडव्हर्टायझिंग**

◆

मुखपृष्ठ
**जयदीप कडू**

◆

मुद्रितशोधन
**अशोक देव**

◆

मुद्रणस्थळ
**पुणे विद्यार्थी गृह,**
महाराष्ट्र मुद्रणशाळा छापखाना
सदाशिव पेठ, पुणे
४११०३०.

◆

मूल्य : १५ रुपये

◆

प्रकाशन क्र. ३५६
जुलै-सप्टेंबर २०१६

◆



# अं | त | रं | ग



संपादकीय

डॉ. पुरुषोत्तम काळे

# एका ज्ञानतपस्वीचे महानिर्वाण

महाराष्ट्र साहित्यपत्रिकेचा हा ३५६ वा अंक आपल्याला सादर करताना मनामध्ये संमिश्र भावना आहेत. गेल्यावेळी रा. ग. जाधवसर गेले आणि या अंकाअगोदर रा. चिं. ढेरे यांचे दुःखद निधन झाले. रा. चिं. ढेरे यांना आदरांजली वाहताना हा अंक 'रा. चि. ढेरे विशेषांक' काढावा असे संपादक मंडळाच्या बैठकीत ठरले.

डॉ. रामचंद्र चिंतामण ढेरे हे इतिहासाचार्य वि. का. राजवाडे, ज्ञानकोशकार श्री. व्यं. केतकर, धर्मानंद कोसंबी, वासुदेवशास्त्री खरे, राजारामशास्त्री भागवत इत्यादी महान संशोधकांच्या परंपरेतील संशोधक होते. इतिहास, धर्मशास्त्र, दैवतशास्त्र, पुरातत्वशास्त्र, संस्कृती, समाजशास्त्र, भाषाशास्त्र, मानवंशशास्त्र अशा अनेक विद्याशाखांचे साहाय्य घेत रा. चि. ढेरे यांनी आपली संशोधनसाधना केली. ६०-६५ वर्षे अखंड संशोधन व्रतस्थ वृत्तीने करणे ही सोपी बाब नाही. साधनांची कमतरता, परिस्थितीने केलेले आघात आणि प्रसंगी कठोर टीका सोसूनही ते आपल्या संशोधन कार्यात मग्न राहिले. शंभराहून अधिक ग्रंथ, अनेक शोधनिबंध आणि गावोगावी पायपीट करून मिळविलेले अनेक दुर्मिळ ग्रंथ, हस्तलिखिते त्यांच्या संशोधनरूपी तपश्चर्येची साक्ष देतात. लोकसंस्कृतीचा अभ्यास करून संस्कृतीमधील परंपरांचे आदिम अवशेष कसे शोधावेत याचा आदर्श वस्तुपाठ त्यांनी इतर संशोधकांना घालून दिला. संतसाहित्य, वारकरी संप्रदाय आणि इतर संप्रदायांबद्दलचे त्यांचे संशोधन त्यांच्या विलक्षण दृष्टीचा प्रत्यय देते. संतांनी आपल्या विचारप्रसारार्थ लोकसंस्कृतीतील विविध घटकांचे बाह्यांग स्विकारून त्यांच्या अंतरंगात अध्यात्म भरले आणि संतसाहित्यातील व्यापक लोकतत्वाची ओळख ढेरे 'संतसाहित्य आणि लोकसाहित्य : काही अनुबंध' या ग्रंथातून करून दिली. ढेरे यांची ही विलक्षण दृष्टी 'खंडोबा', 'मराठी लोकसंस्कृतीचे उपासक', 'लोकसाहित्य : शोध आणि समीक्षा'या ग्रंथातून दिसून येते.

'लज्जागौरी' या ग्रंथामधून विश्वसर्जनाच्या देवतेच्या आदिरूपाचा शोध रा. चिं. ढेरे यांनी घेतला. या संशोधनाचे सुरूवातीचे निष्कर्ष त्यांनी 'शक्तिपीठाचा शोध' या पुस्तिकेमधून मांडले. हा निबंध वाचून नरहर कुरूंदकर यांनी लिहिलेला लेख या अंकात पुनर्मुद्रित केला आहे. त्यामध्ये कुरूंदकरांनी ज्या अपेक्षा व्यक्त केल्या होत्या त्या लज्जागौरी या ग्रंथात ढेरे यांनी पूर्ण केल्या. विश्वसर्जनाच्या देवतेची, लज्जागौरीची विविध नावे, रूपे उपासनापद्धती याचा शोध ढेरे यांनी घेऊन बहुजनवर्गाच्या या देवतेचे आदिम रुप आणि उपासनापद्धती याविषयी नोंदविलेली निरीक्षणे चिंत्य आहेत.

महाराष्ट्र आणि कर्नाटकातील बहुसंख्य लोकांचे आराध्यदैवत विठ्ठल हा समाजातील सर्व घटकांचा, पंथांचा महासमन्वय कसा साधतो हे 'श्रीविठ्ठल : एक महासमन्वय' या ग्रंथातून साधार दर्शविले आहे. खंडोबा, जोतिबा या देवता क्षेत्रपाल असून त्यांचे क्षेत्रपाल भैरवाशी असलेले नाते ते दाखवितात. रा. चि. ढेरे यांचे कवीमन आणि संवेदनशील वृत्ती त्यांचे ग्रंथ वाचताना जाणवते. यामुळेच त्यांच्या संशोधन ग्रंथांच्या अनेक आवृत्या निघाल्या. संस्कृत, इंग्रजी, हिंदी आणि कानडी भाषांवर त्यांचे मराठीइतकेच प्रभुत्व होते. 'तुळजाभवानी' ग्रंथात ढेरे यांनी जयराम पिंड्ये लिखित 'पर्णालपर्वताख्यान' या

ग्रंथातील शिवाजीमहाराजांनी प्रतापगडावर देवीची केलेली पुजा, देवीचे रूप आणि महाराजांना झालेला साक्षात्कार याचा संदर्भ दिला आहे. ढेरे यांचे लिखाण संदर्भसंपृक्त असे. विविध ज्ञानशाखातील त्यांचे ज्ञान स्तिमित करीत असे. आपले मत पुराव्यानिशी आणि संदर्भासह मांडूनही इतरांना ते पटले नाही तरी हट्टाग्रह ते धरीत नसत. संशोधनाच्या मर्यादांविषयी ते सजग असत. संशोधनामधील निष्कर्ष सत्याशी प्रतारणा न करता ते मांडीत. त्यांच्यावर टीकेचे आघात झाले, कोर्टकचेऱ्या झाल्या परंतु त्यांनी सत्याची कास सोडली नाही. संशोधनावरील इतक्या अव्यभिचारी आणि अविचल निष्ठेचा संशोधक अभावानेच आढळेल.

रा. चि. ढेरे यांना काही पुरस्कार मिळाले काही मिळाले नाहीत. त्याबद्दल हर्ष-खेद काहीही न बाळगता संतांच्या स्थितप्रज्ञ वृत्तीने ते ज्ञानसाधना करीत राहिले. 'पुण्यभूषण' पुरस्कार स्विकारताना त्यांनी संशोधनक्षेत्राच्या भवितव्याविषयी आणि अनास्थेविषयी गंभीर चिंता व्यक्त केली होती. या विशेषांकामध्ये वर्षा गजेंद्रगडकर यांनी 'समृद्ध सहवास' या लेखातून अण्णा संशोधक आणि माणूस म्हणून कसे होते, याचे हृद्य वर्णन केले आहे. प्रा. मिलिंद जोशी, डॉ. रमेश जाधव, डॉ. बाळासाहेब बळे यांनी आपापल्या लेखांमधून अण्णांची थोरवी गाईली आहे. रा. चिं. ढेरे यांचे प्रकाशक, पद्मगंधा प्रकाशनाचे अरूण जाखडे यांनी अण्णांचा 'भारताचे थोर संशोधक' ही उपाधी देऊन उचित गौरव केला आहे. त्यांच्याबद्दल जाखडे यांनी 'युगप्रवर्तक आणि युगान्तक' या संज्ञा वापरल्या आहेत. जाखडे यांची मांडणी चिंतनीय आहे. डॉ. सतीश बडवे, डॉ. रमेश जाधव आणि प्रा. मिलिंद जोशी यांचे लेख रा. चि. ढेरे यांच्या कार्यावर भाष्य करणारे आहेत. प्रा. मिलिंद जोशी यांनी अण्णांच्या माणूसपणाचा 'देवमाणूस' असा गौरव केला आहे. तो सार्थ आहे.

रा. चिं. ढेरे यांना म.सा. पत्रिका आणि म.सा.परिषदेतर्फे विनम्र आदरांजली.

याच काळात ज्ञानपीठविजेत्या, कृतीशील विचारवंत आणि साहित्यिक महाश्वेतादेवी यांचे निधन झाले. 'अरण्येर अधिकार', 'बिरसा मुडा', 'हजार चौरासिर मा' अशा अनेक साहित्यकृती वाचताना भाषा, धर्म आणि वंचितांच्या वेदनांचा त्यांनी घेतलेला परामर्श अंतर्मुख करणारा आहे.

बारामतीच्या तुळजाराम चतुरचंद महाविद्यालयातील निवृत्त प्राध्यापक कुमार अय्यर सरांचेही दुःखद निधन झाले. व्रतस्थ वृत्तीचे आणि महात्मा गांधींच्या 'अपरिग्रह' या तत्वावर नितांत श्रद्धा असणारे प्रा. अय्यर सर इंग्रजीचे विद्वान प्राध्यापक तर होतेच पण सर्व विद्यार्थ्यांना पितृतुल्य असे होते. अय्यर सर महाराष्ट्र साहित्य परिषदेचे आजीव सभासद होते.

महाश्वेतादेवी आणि प्रा. अय्यर सरांना विनम्र आदरांजली.

हा अंक विशेषांक असल्याने नियमित सदरे देता आली नाहीत. रसिक वाचकांना हा अंक आवडेल आणि पहिल्या (३५५व्या) अंकाप्रमाणेच या अंकाचेही स्वागत ते करतील ही आशा आहे.

या अंकासाठी ढेरे कुटुंबियांनी रा. चिं. ढेरे यांच्यावरील काही लेख आणि फोटो उपलब्ध करून दिले. आम्ही अरुणा ढेरे, मिलिंद ढेरे आणि वर्षा गजेंद्रगडकर यांचे ऋणी आहोत. मा. कार्याध्यक्ष मिलिंद जोशी, प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे, कोषाध्यक्ष सुनीताराजे पवार, संपादन मंडळातील सर्व सदस्य, आर्ट ॲडव्हर्टायझिंगचे प्रदीप खेतमर, मुखपृष्ठकार जयदीप कडू, संपादन साहाय्यक संदीप खाडे आणि ज्योत्स्ना नांदगिरीकर यांनी हा अंक उत्तम व्हावा यासाठी परिश्रम घेतले याबद्दल त्यांचे आभार!

◆

**डॉ. पुरूषोत्तम काळे**
चलभाष : ९४०४९३७७१०
purushottamdkale@gmail.com

(टीप : हा अंक मसापच्या www.masapapune.org या संकेतस्थळावर तसेच डेलीहंट या मोबाइल ॲपवरही उपलब्ध आहे.)



अनुक्रमणिका



अतिशय प्रतिकूल परिस्थितीतून स्वतः
अफाट श्रम करून उद्योग क्षेत्रात
उत्तुंग भरारी घेतलेल्या मराठी उद्योजकांच्या
यशोगाथा सांगणारी
वि. दा. पिंगळे लिखीत ३ खंड.

# प्रेरणास्रोत मराठी उद्योजक








पुस्तके महाराष्ट्रात सर्वत्र उपलब्ध आहेत.
शब्दाई प्रकाशन, पुणे. मोबाइल : ९८८१२३५०३३



वि. दा. पिंगळे (लेखक)
कार्यवाह- महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे



लेख

प्रा. मिलिंद जोशी

# देवमाणूस



अण्णांची संशोधनवाट साधी-सोपी-सरळ कधीच नव्हती. या वाटेवर फुलांपेक्षा काटेच अधिक होते. त्यांना टीकाकारांपेक्षा टीकाखोर वृत्तीचे लोकच अधिक भेटले. अव्यभिचारी जीवननिष्ठा आणि वाङ्मयनिष्ठा असणाऱ्या अण्णांच्या वाट्याला संशोधनाच्या या वेडापायी कोर्टकचेऱ्याही आल्यामुळे आर्थिक, मानसिक आणि शारीरिक त्रासही झाला; पण अण्णांची संशोधननिष्ठा तसूभरही ढळली नाही. संशोधनातून गवसलेले सत्य त्यांनी निर्भयपणे सांगितले. ज्ञानाची क्षेत्रे गढूळ होत असताना आणि समाजातील सर्व प्रश्न अकारण भावनिक करून तेढ निर्माण करण्याचे षड्यंत्र रचले जात असतानाही 'सत्य असत्याशी। मन केलें ग्वाही। मानियलें नाही। बहुमता।' हा तुकारामांचा निर्भय बाणा अण्णांनी कधीही सोडला नाही.





१ जुलैला अण्णांची प्रणाज्योत मालवली आणि सरस्वतीचा गाभारा रिकामा झाला. प्राचीन साहित्याचे गाढे अभ्यासक, प्रतिभाशाली संशोधक, व्रतस्थ वृत्तीचे ज्ञानोपासक, लोकसंस्कृतीचे मीमांसक या नात्यांनी डॉ. रा. चिं. ढेरे महाराष्ट्रात ख्यातनाम होते. त्यांना सर्वजण 'अण्णा' म्हणत. अण्णा हे महाराष्ट्रातलेच नव्हे तर भारतातले एक महत्त्वाचे संशोधन विद्यापीठ होते. गेली साठ वर्षे कोणत्याही वेतन आयोगाशिवाय, अनुदानाशिवाय, मनुष्यबळ आणि पायाभूत सुविधांशिवाय हे अण्णा नावाचे विद्यापीठ अव्याहतपणे आणि अखंडितपणे संशोधनाचे काम करून महाराष्ट्राची सांस्कृतिक श्रीमंती वाढवीत होते. एखाद्या पारंपरिक अथवा अभिमत विद्यापीठाला हेवा वाटावा असे हे अण्णा विद्यापीठ होते- Dr. Ramchandra Chintaman Dhere Research University.

प्राचीन आणि मध्ययुगीन मराठी संस्कृती आणि साहित्य अण्णांच्या संशोधनाच्या केंद्रस्थानी राहिलेले आहे. अण्णांच्या संशोधनकार्याचे वेगळेपण म्हणजे आपल्या संशोधनप्रक्रियेत त्यांनी अभिजनांच्या संस्कृतीपेक्षा बहुजनांच्या संस्कृतीला अधिक महत्त्व दिले. ह्यासाठी त्यांनी प्रामुख्याने लोकतत्त्वीय दृष्टीचा अवलंब केला. आपल्या संशोधनप्रवासात त्यांनी परंपरेचा आदर केलाच, त्याचबरोबर अनेक नव्या वाटाही चोखाळल्या. आधुनिक संशोधनपद्धतीचे



अनुक्रमणिका

अवलंबन करतानाच तत्त्वज्ञान, धर्मशास्त्र, समाजशास्त्र, भाषाशास्त्र, मानसशास्त्र, मानववंशशास्त्र आणि स्थलशास्त्र या साऱ्या ज्ञानशाखांचा आधार घेतला. आंतरविद्या- शाखीय आणि बहुविद्याशाखीय दृष्टिकोनाचा सुरेख समन्वय अण्णांच्या संशोधनात सापडतो. अण्णांच्या संशोधनकार्याचे आणखी एक वेगळेपण म्हणजे ते केवळ संशोधन करून थांबले नाहीत, तर पुढच्या अनेक पिढ्यांसाठी त्यांनी संशोधनविषय निर्माण करून ठेवले.

सर्व सोयींनी सुसज्ज अशा बंदिस्त खोलीत बसून, पूर्वसुरींच्या ग्रंथाचा आधार घेत आणि त्यालाच प्रमाणभूत मानून संशोधन केल्याचा आव आणत संशोधक म्हणून मिरवणाऱ्यांची संख्या या महाराष्ट्रात कमी नाही. अण्णांचे वेगळेपण असे, की संशोधनासाठी कोणतेही आर्थिक पाठबळ नसताना व्रतस्थ संशोधकाच्या भूमिकेतून, प्रकृतीच्या असंख्य तक्रारी असतानाही त्यांनी भारतभर प्रवास केला. 'वडिलीं जे निर्माण केले। तें पाहिलें पाहिजे।' हे समर्थवचन प्रमाण मानून त्यांनी संदर्भस्थळांचे प्रत्यक्ष पर्यटन केले. संशोधनासाठीची सामग्री गोळा केली आणि नंतरच संशोधनाच्या वाटा चोखाळल्या.

या अण्णा विद्यापीठाचे 'बेसिक इन्फ्रास्ट्रक्चर काय?' असा प्रश्न कुणी विचारला तर उत्तर अगदी सोपे आहे. पुण्याच्या सहकारनगरातील तुळशीबागवाले कॉलनीतील 'विदिशा' नावाचे दुमजली घर म्हणजे या अण्णा विद्यापीठाचे बेसिक इन्फ्रास्ट्रक्चर. प्रचंड हा शब्ददेखील थिटा वाटावा इतकी उदंड ग्रंथसंपदा त्यांच्या घरात आहे. भांड्याकुंड्यांचा संसार करणाऱ्या माणसांना ज्या प्रकारचे मोह पडतात ते ढेऱ्यांच्या कुटुंबातील माणसांना पडायला काय हरकत होती? पण ते त्यांना पडले नाहीत. प्रसंगी सर्व प्रकारच्या असुविधांचा स्वीकार करीत हे घर अण्णांच्या आणि त्यांच्या संशोधनाच्या पाठीशी खंबीरपणे उभे राहिले. घरात नव्या वस्तू घेण्यापेक्षा अण्णांना हवा असणारा दुर्मिळ ग्रंथ घरात कसा येईल याचीच दक्षता त्यांच्या घराने नेहमी घेतली. अण्णा तपाच्या ज्या वाटेने गेले ती वाट स्वतःला असामान्य म्हणविणाऱ्या भल्या भल्या प्रतिभावंतांना मानवणारी नाही. झेपणारी तर मुळीच नाही. अण्णा या वाटेने जात असताना 'भिऊ नका, आम्ही तुमच्या केवळ पाठीशी नाही तर बरोबर आहोत' असा विश्वास देणाऱ्या आणि अण्णा नावाच्या महावृक्षाला जपणाऱ्या ढेरे कुटुंबीयांचे तप आणि त्याग अण्णांच्या तपाइतकाच आणि त्यागाइतकाच महत्त्वाचा आहे.

अण्णांच्या संशोधनाचा व्याप आणि परीघ 'अणूपासोनि ब्रह्मांड एवढा होत जातसे।' या समर्थवचनाची आठवण येत राहावी इतका मोठा आहे. कधी दत्तसंप्रदाय, कधी नाथसंप्रदाय, कधी वारकरी संप्रदाय तर कधी महानुभव संप्रदाय अण्णांच्या संशोधनाचे विषय बनले. भारतीय रंगभूमीचा शोधही त्यांनी तितक्याच मनोभावे घेतला. 'देवांनाही नाही कळला अंतपार ज्याचा। कानडा राजा पंढरीचा।।' असा ज्याचा उल्लेख केला जातो त्या विठ्ठलाने अण्णांना वेड लावले. अठरापगड जातींत विभागलेला समाज 'विठ्ठल' नावाच्या ध्वजाखाली एकत्र आणून संतांनी महासमन्वय घडवून आणला.. वारी नावाच्या अलौकिक भक्तिनाट्याचे विलक्षण आकर्षण असणाऱ्या अण्णांनी 'श्री विठ्ठल : एक महासमन्वय'सारखा अलौकिक संशोधनग्रंथ सिद्ध केला. सोन्या-चांदीच्या ऐश्वर्यात भक्तांसमोर प्रकटणाऱ्या वेंकटेशाचा वेध अण्णांच्या लेखणीने घेतला. वेंकटेशावर रुसून कोल्हापूरला येऊन राहिलेली आणि करवीरनिवासिनी झालेली महालक्ष्मी त्यांच्या चिंतनाचा विषय बनली. ज्या भवानीला साकडे घालून छत्रपती शिवाजी महाराजांनी स्वराज्याची स्थापना केली आणि 'दुष्ट संहारिले मागे। ऐसे उदंड ऐकिलें। परंतु रोकडे कांही। मूळ सामर्थ्य दाखवी।' असा जाब साक्षात समर्थांनी जिला विचारला होता ती तुळजाभवानी अण्णांच्या संशोधनाचा विषय बनली.

कधी दक्षिणेचा लोकदेव असलेल्या खंडोबाने, तर कधी शिखर शिंगणापूरच्या शंभूमहादेवाने त्यांना संशोधनासाठी साद घातली. अण्णांनी मराठी संतांच्या दृष्टिकोनातून महाराष्ट्रातील विविध लोकदैवतांचा विकासक्रम रेखाटला. भारतातील देवी उपासनेचा उगम आणि विकास स्पष्ट करताना 'आनंदनायकी' आणि 'लज्जागौरी'सारखे अद्वितीय संशोधनग्रंथ सिद्ध केले. मला कधी कधी असे वाटते, महाराष्ट्रातल्याच नव्हे तर भारतातल्या सगळ्या लोकदेवतांना असे वाटले असेल, आपल्या जन्मकथा, आपल्याविषयीच्या लोककथा आणि लोकश्रद्धा, त्यांतून निर्माण झालेली उपासना संस्कृती या साऱ्या गोष्टी अक्षरबद्ध करण्यासाठी एखाद्या मराठी संशोधक-सारस्वताची योजना आपण करावी, आणि ते काम करण्यासाठीच त्यांनी अण्णांना जन्माला घातले असावे. जसे शिवशाहीर बाबासाहेब पुरंदरे शिवचरित्रकथनाला उभे राहिले, की इतिहासातले सगळे पराक्रमी वीरपुरुष त्यांना विनंती करीत असतील की माझ्याविषयी बोला. प्राचार्य शिवाजीराव भोसले व्याख्यानासाठी उभे राहिले, की शब्दांची लडच्या लड त्यांच्यासमोर येऊन त्यांना प्रेमपूर्वक बजावत असेल, आम्हाला व्याख्यानात घ्या, आम्हाला व्याख्यानात घ्या. तसे अण्णांच्या संशोधन दरबारात देवदेवता रांगेत उभ्या असत

आणि अण्णांना सांगत असत, आमच्याविषयी लिहा. माणसे देवाच्या दारात रांगेत उभी असतात, पण ज्यांच्या अंगणात देव रांगेत उभे असत असा देवमाणूस म्हणजे अण्णा.

अण्णांची संशोधनवाट साधी-सोपी-सरळ कधीच नव्हती. या वाटेवर फुलांपेक्षा काटेच अधिक होते. त्यांना टीकाकारांपेक्षा टीकाखोर वृत्तीचे लोकच अधिक भेटले. अव्यभिचारी जीवननिष्ठा आणि वाङ्मयनिष्ठा असणाऱ्या अण्णांच्या वाट्याला संशोधनाच्या या वेडापायी कोर्टकचेऱ्याही आल्यामुळे आर्थिक, मानसिक आणि शारीरिक त्रासही झाला; पण अण्णांची संशोधननिष्ठा तसूभरही ढळली नाही. संशोधनातून गवसलेले सत्य त्यांनी निर्भयपणे सांगितले. ज्ञानाची क्षेत्रे गढूळ होत असताना आणि समाजातील सर्व प्रश्न अकारण भावनिक करून तेढ निर्माण करण्याचे षड्यंत्र रचले जात असतानाही 'सत्य असत्याशी। मन केलें ग्वाही। मानियलें नाही। बहुमता।' हा तुकारामांचा निर्भय बाणा अण्णांनी कधीही सोडला नाही. शंभराहून अधिक संशोधनग्रंथ सिद्ध करून मराठी साहित्यशारदेचा संशोधनदरबार समृद्ध करणाऱ्या अण्णांचे बाराहून अधिक ग्रंथ इंग्रजीतून प्रकाशित होण्याच्या मार्गावर आहेत. धर्म, समाज आणि संस्कृती यांच्या परस्परसंबंधांवर प्रकाश टाकणारे अण्णांचे असंख्य संशोधनग्रंथ ही महाराष्ट्राचीच नव्हे तर भारताची सांस्कृतिक समृद्धी आहे. अण्णा असंख्य देशीविदेशी अभ्यासकांचे श्रद्धास्थान आहेत.

अण्णांच्या वाट्याला उत्तरायुष्यात सारे मानसन्मान आले, लोकप्रेमाइतकीच लोकमान्यताही त्यांना मिळाली; पण ऐन उमेदीच्या काळात अण्णांनी दुर्दैवाचे दशावतार अनुभवले. दुःख आणि दारिद्र्य त्यांच्या पाचवीलाच पुजलेले होते. चमत्कारिक घटनांनी त्यांचे बालपण होरपळून निघाले. संकटांच्याच मालिका सटवाईने त्यांच्या पत्रिकेत लिहिलेल्या होत्या; पण प्राप्त परिस्थितीचा संयमाने स्वीकार करीत श्रद्धाळू अण्णा वाटचाल करीत राहिले आणि त्यांच्या कर्तृत्वाच्या शिखराला अभिवादन करण्यात नंतर नियतीनेही धन्यता मानली.

अण्णांचा जन्म पुणे जिल्ह्यातील अंदर मावळातील निगडे या गावचा. १९३० साली २१ जुलैला अण्णांचा जन्म झाला आणि १९३५ च्या मध्यात त्यांच्या आई-वडलांचा मृत्यू झाला. तेव्हापासून १९४३ सालापर्यंतचा आठ वर्षांचा काळ अण्णांनी आजोळघरी काढला. घरात हयात दोनच माणसे होती. अशक्त, आजारी आणि ब्रह्मचारी मामा आणि दुःखदारिद्र्याच्या सोबतीने काळ कंठणारी नव्वदीतली म्हातारी आजी. असे असले, तरी आजोबांनी कऱ्हेकाठच्या वाईमधल्या कुठल्याशा पाठशाळेतून आणलेला विद्याभ्यासाचा वसा होता. संस्कृत-प्राकृत हस्तलिखिते, पोथ्यापुराणे आणि संस्कृतीचा जयघोष करणाऱ्या अनेक गोष्टींचा मोठा संग्रह घरात होता. आजीच्या रूपात मौखिक परंपरागत ज्ञानाचे भांडार होते. याच्या सोबतीला काठोकाठ दारिद्र्य होते. 'लोकसंस्कृतीचे प्रातिभ दर्शन' या अण्णांच्या गौरवग्रंथात या ग्रंथाचे संपादन करणाऱ्या त्यांच्या कन्या डॉ. अरुणा ढेरे यांनी लिहिले आहे, 'कला, दारिद्र्य आणि शिवाय भलेपण यांचे एकत्र येणे नेहमीच यातनामय असते. अण्णा तसल्या आयुष्याला गाठीला बांधून मोठे झाले, दुबळी सोशिकता घेऊन मोठे झाले. निरपेक्ष माया पोरक्या मुलाला कधी कधी जे अति हळवेपण देते ते घेऊन ते मोठे झाले. निर्धनाला न परवडणारा स्वाभिमान घेऊन मोठे झाले.'

अण्णांच्या वयाच्या चौदाव्या वर्षी आजी-मामांनी अण्णांना आणि त्यांच्या धाकट्या बहिणीला शिक्षणासाठी पुण्यात आणले. तेरा-चौदा वर्षांच्या अण्णांजवळ खूप मोठी सांस्कृतिक शिदोरी होती. त्यांना पोथ्या वाचता येत होत्या, उत्तम चित्रे काढता येत होती. गावाकडच्या तमाशा फडांसाठी लावण्या रचता येत होत्या. सुतारकामाचे उत्तम कौशल्य होते. हाताने मातीच्या, शाडूच्या देखण्या मूर्ती घडवता येत होत्या. भिंतीवर पौराणिक देखावे रंगवता येत होते. अक्षर मोत्यासारखे होते. प्रतिभा आणि प्रज्ञा यांचा सुरेख संगम त्यांच्या कोवळ्या व्यक्तिमत्त्वात होता.

पुण्यात आल्यानंतर अवघ्या आठ-नऊ वर्षांतच त्यांनी आजी आणि मामांचाही आधार गमावला. पुण्यात जगण्यासाठी अण्णांनी सर्व प्रकारची धडपड केली. अण्णा रात्रशाळेत शिकले. शाळेचे शिक्षण पूर्ण होण्याआधीच अण्णा ललित वाङ्मयाकडे ओढले गेले. त्यांच्या समवयस्क मित्रांचे एक मंडळही स्थापन झाले होते. त्याचे नाव होते 'सविता मंडळ'. रविकिरण मंडळाची आठवण करून देणारे नाव मंडळाला दिलेले असले, तरी मंडळाचे सदस्य मात्र बालकवी-गोविंदाग्रज-तांबे यांच्याच कवितांनी अधिक भारलेले होते. कवितांखेरीज ही मंडळी कथा, ललित निबंध, व्यक्तिचित्रे आणि समीक्षा यांतही रस घेत होती.

जरि वीज कडाडे, मेघ गडाडे गगनी
जरि जलप्रलयमय हो ही सारी अवनी
जरि प्रचंड सागर, उंच उफाळत लाटा
निश्चित ध्येयरत तनू शोधिते वाटा

अशी 'ध्येयपथाकडे' नावाची त्यांची कविता सह्याद्री मासिकाच्या १९४८ च्या एका अंकात प्रसिद्ध झाली तेव्हा अण्णा अठरा वर्षांचे होते. वाईच्या स्वस्तिक सॅनिटोरियममध्ये असताना त्यांनी 'भाऊबीज' नावाचे खंडकाव्यही लिहिले होते. १९५३ ते १९६० या काळात आकाशवाणीच्या पुणे

आणि मुंबई केंद्रासाठी अण्णांनी पाच संगीतिका लिहिल्या. कांचनमृग, प्रेमयोगिनी मीरा, महाकवी बिल्हण, यक्षप्रिय, अभिशाप या त्यांच्या संगीतिकांतील गीतांत वृत्त-छंदांतील विविधतेबरोबर रसमधुरताही आहे.

असे असले तरी पुढे कविता मागे सरली आणि संशोधन हाच अण्णांचा ध्यासविषय बनला.

१९५१ च्या आसपास भोरच्या पंतसचिवांनी 'शंकराजी नारायण' पारितोषिकासाठी 'नाथ संप्रदाय' या विषयावर संशोधनात्मक प्रबंधाचे आवाहन केले. हे आवाहन अण्णांनी आव्हान म्हणून स्वीकारले. त्या वेळी अण्णा एकवीस वर्षांचे होते. मराठीत शुद्ध ऐतिहासिक दृष्टीने नाथ संप्रदायावर एखादाही लेख उपलब्ध नव्हता. अण्णा कामाला लागले. १९५३ साली पारितोषिक जाहीर झाले ते अण्णांच्या नावाने. पारितोषिकाची लहानशी रक्कम आर्थिक गरज भागवेल म्हणून अण्णांनी या स्पर्धेत भाग घेतला खरा; पण या स्पर्धेच्या निमित्ताने अण्णांना सापडलेली संशोधनाची वाट ही त्यांच्यासाठी मोठी कमाई ठरली.

पुढे पानशेतच्या पुराने अण्णांना मोठा तडाखा दिला आणि घरात जमवलेली पाच-दहा हजार पुस्तके वाहून गेली. जिवापाड जपलेल्या ग्रंथांचा अक्षरशः लगदा होताना 'याचि देही याचि डोळा' पाहिला. 'योगेश' या टोपणनावाने लिहिलेल्या कविताही वाहून गेल्या आणि कवी होण्याची ऊर्मीही गेली. त्या काळात अण्णांना आणि त्यांच्या कुटुंबाला एका मंगल कार्यालयात आसरा घ्यावा लागला होता. याच काळात सरकारी योजनेतून लेखक-कलावंतांना मिळणाऱ्या आर्थिक मदतीचा लहानसा आधार तर्कतीर्थांनी साधारण वर्षभरापुरता अण्णांना मिळवून दिला.

अण्णांच्या नाथ संप्रदायावरील पहिल्यावहिल्या कामाची नोंद घेऊन विद्यानिधी सिद्धेश्वरशास्त्री चित्राव, महामहोपाध्याय दत्तो वामन पोतदार आणि सरदार आबासाहेब मुजुमदार यांसारख्या दिग्गजांनी अण्णांना स्नेह तर दिलाच, पण ध्येयासाठी आयुष्याची किंमत मोजावी लागते हा मूलमंत्रही दिला. अण्णांनी तो आयुष्यभर प्राणपणाने जपला.

काहीही ओळखपाळख नसताना पोरवयातले अण्णा एके दिवशी सरदार आबासाहेब मुजुमदारांच्या वाड्यात त्यांच्यापुढे जाऊन उभे राहिले आणि त्यांच्या व्यक्तिगत ग्रंथसंग्रहालयामधली पुस्तके वाचायला मिळावीत अशी त्यांना विनंती केली. आबासाहेबांनी अण्णांकडे पाहिले आणि ते म्हणाले, "केव्हाही ये आणि लागतील ती पुस्तकं तुझ्यासाठी घेऊन जा. ती सारी पुस्तकांची कपाटं तुझ्यासाठीच आहेत असं समज."

"घरी?" अण्णांनी आश्चर्यचकित होऊन विचारले. आबासाहेबांनी 'हो' म्हटल्यावर अण्णांनी पुस्तके निवडून त्यांची यादी करायला सुरुवात केली तेव्हा आबासाहेब म्हणाले, "गरज नाही पुस्तकांची यादी करण्याची. माझ्या संग्रही जी पुस्तकं आहेत ती वाचण्याची इच्छा बाळगणारा मुलगा ती पुस्तकं बाजारात विकायचा नाही याची खात्री आहे मला. ही पुस्तकं तू घेऊन जा. तुझा नाव-पत्ता तेवढा देऊन ठेव."

आबासाहेबांनी अण्णांचा नाव-पत्ता मागितला तो घरी येण्यासाठी. शाळकरी मुलगा असलेल्या अण्णांच्या दीड खणाच्या कोंदट खोलीत आबासाहेब मुजुमदार त्यांच्या वाड्यातल्या भव्य गणपती उत्सवाचे निमंत्रण द्यायला ते हयात असेपर्यंत टांग्यातून यायचे. सिद्धेश्वरशास्त्री, दत्तो वामन पोतदार किंवा सरदार आबासाहेब मुजुमदार यांच्या स्नेहाचा अण्णांनी व्यक्तिगत आयुष्यासाठी कसलाही लाभ करून घेतला नाही. मात्र, त्यांच्या सहवासातून एका संशोधकाची आचारसंहिता त्यांनी तयार केली.

संशोधनाची वाट चोखाळताना त्यांनी पूर्वसुरींना कधीही निकालात काढले नाही. इतिहासाचार्य राजवाडे, सारस्वतकार भावे, वासुदेवशास्त्री खरे, ना. गो चापेकर आणि रावबहादूर पारसनीस यांच्या संशोधनातल्या चुका निदर्शनाला जरूर आणून दिल्या; पण त्यांचे काम नव्याने विस्तारताना त्यांच्या योगदानाचेही महत्त्व अधोरेखित केले आणि त्यांच्या ऋणाचीही आठवण ठेवली. अण्णांनी संतसाहित्याचेही अनेक अंगांनी पुनर्मूल्यांकन केले. मराठी साहित्यातल्या अनेक अलक्षित आणि अज्ञात ग्रंथकारांचे त्यांनी संशोधनपूर्वक नवदर्शन घडविले. लोकसाहित्याच्या अभ्यासाला नवी अध्ययनदृष्टी तर दिलीच व त्याचबरोबर लोकसाहित्य समीक्षेची पायाभरणी करून तिला परिभाषाही दिली. महाराष्ट्र संस्कृतीचे भारतीय संदर्भाच्या व्यापक पटलावर अवलोकन करताना अण्णांनी संशोधनक्षेत्राला समग्रतेचे भान दिले. संस्कृतीच्या क्षेत्रात अभ्यास आणि संशोधन करणे हे तसे जिकिरीचे काम असते. कारण संशोधनातून गवसलेले सत्य स्वीकारण्यासाठी लोकमानस प्रगल्भ असावे लागते. दुसरे असे, की संस्कृतीचा अभ्यास हा धर्मधारणांशी निगडित असल्यामुळे तो अनेकदा अतिसंवेदनशील विषय होऊन बसतो. त्यामुळे सांप्रदायिक निष्ठा असणाऱ्यांना आपले अंतःस्थ हेतू साध्य करण्यासाठी आयतेच कुरण मिळते.

'चक्रपाणी, लज्जागौरी, श्रीविठ्ठल : एक महासमन्वय' या पुस्तकातल्या अण्णांच्या संशोधनाविरुद्ध मोठा गदारोळ उठला. 'चक्रपाणी'च्या निमित्ताने काही मठ-महंतांनी कुमार कुवतीच्या अभ्यासकांना वादासाठी प्रवृत्त केले. काहींनी अण्णांविरुद्ध कोर्टात खटले दाखल करून त्यांना उपद्रव दिला.

'लज्जागौरी'ला अंध देवीभक्तांनी असाच विरोध केला. 'श्री विठ्ठल : एक महासमन्वय' या ग्रंथाच्या निमित्ताने केवळ राजकारणात रस असणाऱ्या अनेक अभ्यासकांनी या विषयाला संशोधनक्षेत्राच्या बाहेर आणून भोळ्या भाविकांच्या श्रद्धेशी खेळण्याचा घृणास्पद डाव खेळला. या वादासंबंधी अण्णांची भूमिका स्पष्ट आणि अनाग्रही राहिली. डॉ. ढेरे यांनी 'लज्जागौरी' या ग्रंथात भारतातील मातृदेवतांच्या-स्त्रीदेवतांच्या उपासनेचा विकास कसा झाला याचा शोध घेतला आहे. प्रारंभी माणसाला सर्व देवता सर्जेंद्रियाच्या रूपातच भावल्या, अनेक ठिकाणच्या देवता या सांगमूर्तिरूप नसून योनीरूप आहेत, असे त्यांचे प्रतिपादन आहे. 'श्री विठ्ठल : एक महासमन्वय' या ग्रंथात 'पांडुरंगमाहात्म्य'च्या आधारे पंढरपूरच्या विठ्ठलमूर्तीचा शोध घेताना एक वादग्रस्त प्रश्न उद्भवला. आजची पंढरपूरची विठ्ठलमूर्ती आणि 'पांडुरंगमाहात्म्य'मध्ये जिचे वर्णन केले आहे अशी छातीवर क्षराक्षर मंत्र कोरलेली मूर्ती ही एकच आहे का- असा तो प्रश्न आहे.'पांडुरंगमाहात्म्य'मध्ये वर्णन केल्यानुसार आजच्या पंढरपूरच्या मूर्तीच्या छातीवर क्षराक्षर मंत्र नाही आणि माढे येथील विठ्ठलमूर्तीच्या छातीवर आहे, असे डॉ. ढेरे यांनी मूर्तीची छायाचित्रे देत सांगितले आहे.

वादळे आली आणि थांबली. वादविषय झालेले ग्रंथ संशोधन क्षेत्रातल्या जाणकारांनी उचलून धरल्यामुळे, या ग्रंथांवर पुरस्कारांनी मोहर उमटविल्यामुळे विरोधकांचे मनसुबे धुळीला मिळाले. या वादांना उत्तरे देण्यात स्वतःची शक्ती खर्ची घालण्यापेक्षा अण्णांनी या वादांच्या प्रकाशात नव्या संशोधनातून आपली दृष्टी तपासत जाणे श्रेयस्कर मानले. कारण अण्णांना समोर प्रचंड कामाचा मोठा डोंगर दिसत होता.

तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी अण्णांना त्यांच्या उमेदवारीच्या काळापासून ओळखत होते. अण्णांचे मोठेपण त्यांनी जोखले होते. त्यांनी अण्णांच्या कामाला जाणकारीने ओळख दिली आणि सतत त्यांची पाठराखण केली. नरहर कुरुंदकरही अण्णांच्या संशोधनाच्या पाठीशी नेहमीच खंबीरपणे उभे राहिले. ते असेपर्यंत अण्णा संशोधक म्हणून कधीही पूर्ण एकटे नव्हते. महाराष्ट्र संस्कृतीचे जर्मन अभ्यासक गुंथर सोन्थायमर हे अण्णांचे मित्र. विदेशी अभ्यासकांना अण्णांच्या संशोधनकार्याविषयी वाटणाऱ्या आदराची आणि त्यांच्या कामाच्या महत्त्वाविषयीची नोंद अनेक ठिकाणी त्यांनी केलेली आहे. ॲन फेल्डहाऊस, एलिनॉर झेलिऑट, ओदविल किंवा इरिना ग्लुश्कोव्हासारख्या पाश्चात्त्य जाणकार अभ्यासकांनीही अण्णांच्या कामाचे मोल जाणून त्यांच्याविषयी कृतज्ञता व्यक्त करण्यात धन्यता मानली. एखाद्या विद्यापीठालाही जे जमणार नाही असे संशोधनकार्य अण्णांनी एकट्याने केलेले आहे.

या देवमाणसाची आणि माझी पहिली भेट वीस वर्षांपूर्वी झाली. अण्णांच्याविषयी मला गुरुस्थानी असणाऱ्या प्राचार्य शिवाजीराव भोसले यांच्याकडून मी खूप ऐकले होते. त्यांचे ग्रंथ मोठ्या जिज्ञासेने वाचले होते पण भेट मात्र झाली नव्हती. पिंपरी-चिंचवडच्या एका कार्यक्रमासाठी अण्णांच्या कन्या डॉ. अरुणा ढेरे यांना कार्यक्रम स्थळी घेऊन जाण्याची जबाबदारी माझ्यावर सोपविण्यात आली होती. त्या निमित्ताने अण्णांच्या घरी मी पहिल्यांदा गेलो. पांढरा शुभ्र पायजमा आणि नेहरू शर्ट घातलेली, पांढरे केस मागे वळवलेली, चेहऱ्यावर अतिशय शांत आणि सात्त्विक भाव असलेली अण्णांची ती प्रसन्नमूर्ती पाहून मी अक्षरशः भारावून गेलो आणि त्यांच्या चरणी नतमस्तक झालो. माझ्यासारख्या अगदी ग्रामीण भागातून आलेल्या आणि साहित्याच्या आणि वक्तृत्वाच्या क्षेत्रात काही तरी करू इच्छिणाऱ्या मुलाला अण्णांच्या पायाशी बसण्याचे भाग्य लाभले हा माझ्या आयुष्यातील आनंदयोगच. पुढे मी साहित्यक्षेत्रात अधिक सक्रिय झाल्यानंतर अण्णांच्या घरी जाणे-येणे वाढले. अण्णांचे घर हे आडगावहून पुण्यात आलेल्या आम्हा मंडळींना माहेरघर वाटू लागले. राहण्यातला आणि वागण्या-बोलण्यातला साधेपणा, ऋजुता, विनम्रता आणि निःस्पृह वृत्ती यांमुळे माणसे अण्णांच्या व्यक्तिमत्त्वाकडे आकर्षित होतात हे मी अनुभवले आहे. पूर्वी काहीशा संकोचाने होणारा अण्णांच्या घरातला माझा वावर अधिक मोकळा झाला. कारण मी ज्या भारती विद्यापीठ विश्वविद्यालयाच्या अभियांत्रिकी महाविद्यालयात प्राध्यापक म्हणून काम करतो आहे, तिथेच 'शाश्वती' या स्त्री सर्जनशक्ती विकास केंद्राच्या संचालक म्हणून डॉ. अरुणा ढेरे कार्यरत होत्या. त्यामुळे घरी जाणे-येणे वाढले. त्यांच्यासमवेत गप्पांच्या अनेक मैफली रंगल्या. अण्णांनी आमचे बोलणे मनःपूर्वक ऐकले. अण्णांसमवेतच्या अनेकविध विषयांवरच्या त्या गप्पांनी मला अधिक श्रीमंत केले. या प्रत्येक भेटीत अण्णांमधला एक हळवा माणूस मी पाहिला. स्नेहांकितांबरोबरच्या गप्पांमध्ये कुणाच्या बोलण्यातून एखाद्या कटू किंवा दुःखद प्रसंगाची आठवण निघाली की अण्णांच्या डोळ्यांच्या ओलावलेल्या कडा मी जवळून पाहिल्या आहेत.

काही वर्षांपूर्वी 'अपेक्षा' नावाच्या दिवाळी अंकात मी माझ्या आई-वडलांवर लिहिलेला लेख प्रसिद्ध झाला. अण्णांच्या तो वाचनात आला. नरकचतुर्दशीच्या दिवशीच सकाळी सकाळी ढेऱ्यांच्या घरातून फोन आला. प्रथम अरुणा

ढेरे बोलल्या. नंतर अण्णा माझ्याशी बोलले. त्यात गहिवर होता. वडिलकीच्या नात्याने केलेली पाठराखण होती आणि कौतुकही होते. अण्णांनी त्यांचे वडीलधारेपण असे अनेकदा निभावले आहे.

अण्णांच्या 'श्री तुळजाभवानी' या ग्रंथाचे प्रकाशन अण्णांच्या वाढदिवसाच्या दिवशी त्यांच्याच घरी शिवशाहीर बाबासाहेब पुरंदरे यांच्या हस्ते झाले. तेव्हा ८९ वर्षांचे असलेले शिवशाहीर या महान संशोधकाला अभिवादन करण्यासाठी कोणाचाही आधार न घेता ढेऱ्यांच्या घराचा लोखंडी जिना चढून वर आले. स्वतःच्या गळ्यातली कवड्यांची माळ शिवशाहिरांनी अण्णांच्या गळ्यात घातली. महाराजांच्या काळातले मावळे त्या वेळी असते तर त्यांनी 'आई राजा उदे उदे। सदानंदाचा उदे उदे।' असा जयघोष करून आसमंत दणाणून टाकला असता. इतिहासपुत्राने सरस्वतीपुत्राला प्रेमालिंगन दिले. या क्षणाला अभिवादन करण्यासाठी इतिहासही क्षणभर थबकला होता. या प्रसंगी उपस्थित असणारे माझ्यासारखे भाग्यवंत या दोन प्रतिभावंतांची हृद्य भेट डोळ्यांत आणि अंतःकरणात साठवून ठेवत होते.

अण्णांचे 'श्री तुळजाभवानी' हे पुस्तक प्रकाशित झाल्यानंतर तुळजापूरच्या देवीच्या मंदिराच्या विश्वस्तांनी अण्णांच्या सत्काराचा कार्यक्रम आयोजित केला होता. अण्णांनी प्रथम नकार दिला, कारण प्रवासाची दगदग झेपणारी नव्हती. 'हा सत्कार म्हणजे देवीचा प्रसाद आहे, नाही म्हणू नका' असा आग्रह झाल्यानंतर अण्णा तयार झाले. पुण्याहून तुळजापूरला जाताना बार्शीमार्गे जावे लागते. 'या मार्गावरून जाताना आई-अण्णांना आवडेल असे साधे मराठमोळे जेवण कुठे मिळेल?' असे अरुणाताईंनी मला फोनवरून विचारले. मी त्यांना 'बार्शीला माझ्याच घरी जा' असा आग्रह केला. घरच्या मंडळींना त्रास नको या सद्भावनेपोटी त्या निमंत्रण स्वीकारायला तयार नव्हत्या. तेव्हा 'बार्शीच्या भगवंताचे दर्शन घेतल्याशिवाय तुम्हाला तुळजाभवानी भेटणार नाही' असे मी बजावले तेव्हा अरुणाताई तयार झाल्या. अण्णांनी संमती दिली. मी बार्शीला असणाऱ्या माझ्या वडलांना, (अप्पांना) ही गोष्ट सांगितली. त्यांचा आनंद गगनात मावत नव्हता. बार्शीच्या भगवंत मंदिरातील विश्वस्तांपर्यंत एव्हाना ही वार्ता पोचली होती. भगवंताच्या भेटीसाठी पुण्याहून दुसरा एक भाग्यवंत आणि देवदेवतांच्या संशोधनासाठी स्वतःचे आयुष्य वेचणारा एक प्रज्ञावंत येतो आहे याचा त्यांना खूप आनंद झाला. अण्णांची गाडी बार्शीत पोचली. अगदी भगवंत मंदिरापर्यंत गेली. अण्णा, त्यांच्या पत्नी इंदुमती आणि अरुणाताई असे तिघे गाडीत होते. भगवंत मंदिराच्या विश्वस्तांनी त्यांना मोठ्या आदराने आणि भक्तिभावाने मंदिरात नेले. अण्णांनी सपत्नीक भगवंताचे दर्शन घेतले. ज्यांच्या रूपात बार्शीकरांना सगुण साकार अशा भगवंताचे दर्शन घडले असे बार्शीतले व्रतस्थ धन्वंतरी अण्णा कश्यपी यांनी अण्णांचा पुष्पहार घालून आणि भगवंताची मूर्ती देऊन हृद्य सत्कार केला. भगवंताच्या गाभाऱ्यात सरस्वतीच्या उपासकाच्या उपस्थितीत भावभक्तीचा मळा फुलला. त्या वेळी गाभाऱ्यात उपस्थित असणारा प्रत्येकजण आई-अण्णांच्या चरणाशी येऊन नतमस्तक झाला. या स्वागताने अण्णा काहीसे संकोचले आणि भारावूनही गेले.

माझ्या वडिलांना (अप्पांना) अण्णा ढेरे या नावाच्या देवमाणसाचे स्वागत करायचे होते पण ते वेगळ्या पद्धतीने. अप्पांनी भगवंत मंदिरापासून ब्राह्मण गल्लीतल्या आमच्या वाड्यापर्यंत ढेरे कुटुंबीयांसाठी पायघड्यांची व्यवस्था केली होती. रस्त्याच्या दुतर्फा उभे राहून लोक पुष्पवृष्टी करीत होते. सनई- चौघडा वाजत होता. एका संशोधक सारस्वताची ही भावपूर्ण मिरवणूक जेव्हा आमच्या वाड्याच्या दाराशी आली तेव्हा पाच सुवासिनींनी ढेऱ्यांना औक्षण केले. अण्णांनी वाड्यात पाऊल टाकले तेव्हा या सारस्वताच्या आगमनाने तो भव्य चौसोपी चिरेबंदी वाडाही आनंदाने गहिवरला. हे सारे अनुभवताना ढेरे पतिपत्नींचे डोळे भरून येत होते. हे मला अरुणाताईंनी पुण्यात आल्यानंतर सांगितले. माझ्या भावजयीने पुरण-वरणाचा छान स्वयंपाक केला होता. त्याचे कौतुक किती तरी दिवस अण्णा करीत होते. अण्णा माझ्या विनंतीला मान देऊन बार्शीतल्या माझ्या घरी गेले, त्यांनी हात ओले केले, यासारखे माझे दुसरे भाग्य ते कोणते? आज माझे वडील हयात नाहीत. ढेऱ्यांसारखा महान संशोधक आपल्या घरी येऊन गेला, याच धुंदीच्या आनंदात माझे वडील किती तरी दिवस वावरत होते. अशी ही जिवाभावाची नाती. ती जपण्यात अण्णांनी नेहमीच धन्यता मानली आहे.

'ऐसी कळवळ्याची जाती' हा माझा व्यक्तिचित्रसंग्रह कॉन्टिनेन्टल प्रकाशनाने प्रकाशित केला. या पुस्तकात 'लाभाविण प्रीती' करणाऱ्या साहित्यिकांची आणि घरातल्या माणसांची व्यक्तिचित्रे मी रेखाटली आहेत. या पुस्तकाला अण्णांचे आशीर्वाद लाभावेत अशी माझी मनोमन इच्छा होती. अण्णांचे वय, त्यांचा लेखन आणि संशोधनकार्याचा या वयातही सुरू असलेला व्याप पाहता त्यांना या कामासाठी विनंती करणे मला प्रशस्त वाटत नव्हते. मी अण्णांना विनंती करणारे एक पत्र डॉ. अरुणा ढेरे यांच्याबरोबर पाठवले. अण्णांनी क्षणाचाही विलंब न करता माझी विनंती मान्य केली. माझ्या एका कविमित्राच्या मुलीच्या लग्नात अण्णांची आणि माझी गाठ पडली. लग्न लागल्यानंतर अण्णांनी त्यांच्या



अनुक्रमणिका

खांद्यावर असलेल्या शबनममधून एक लिफाफा बाहेर काढला. तो माझ्या हातात दिला. त्यात माझ्या पुस्तकाच्या ब्लर्बसाठी अण्णांनी लिहिलेला मजकूर होता. सुरेख टपोरे हस्ताक्षर आणि तितकाच सुंदर आशय असलेला तो ब्लर्ब मी तिथेच वाचला. अण्णांनी शेवटी लिहिले होते, 'शिखराकडे वाटचाल करणाऱ्या या माझ्या छोट्या मित्रास पुढील वाटचालीसाठी मनःपूर्वक शुभेच्छा!' अण्णांच्या आणि माझ्या वयात पंचेचाळीस वर्षांचे अंतर, पण माझा उल्लेख त्यांनी 'छोटा मित्र' असा केला होता. वयाने लहान असणाऱ्यांना मोठेपणा देण्याची अण्णांची रीतच निराळी आहे.

२०१० साल माझ्यासाठी दुर्दैवी ठरले. जूनमध्ये प्राचार्य शिवाजीराव भोसले सर गेले आणि त्याच वर्षी ऑक्टोबर महिन्याच्या नवरात्रात तिसऱ्या माळेला नवी कोरी साडी नेसून भजनाला निघालेली माझी आई हृदयविकाराच्या धक्क्याने आकस्मिक गेली. गुरुमाउली आणि माउली यांना एकाच वर्षात गमावल्याचे दुःख खूप मोठे होते. या घटनेनंतर मी अण्णांना भेटलो. त्यांनी खांद्यावर ठेवलेला हात केवळ स्पर्शातून दिलासा देऊन गेला. 'तू एकटा नाहीस' हाच भाव त्यात होता.

अण्णांच्या घरी त्यांच्या उपस्थितीत गप्पांच्या मैफली अनेकदा रंगल्या. त्या प्रत्येक भेटीत अण्णांमधला एक निखळ, निर्मळ माणूस मी पाहिला. कोणाचीही निंदानालस्ती करताना मी त्यांना कधीही पाहिलेले नाही.

अण्णा मूळ कविप्रकृतीचे, पण ते संशोधनात रमल्यानंतर त्यांच्या कवितेचे काय, असा प्रश्न त्या वीणापुस्तकधारिणी नवरसाची मंदाकिनी असणाऱ्या सरस्वतीला पडला. तो सोडविण्यासाठी तिने अण्णांच्या अंगणात एक कवितेचे झाड लावले ते डॉ. अरुणा ढेरे यांच्या रूपाने. हे झाड अण्णांच्या अंगणात आहे, पण त्या झाडाची फुले महाराष्ट्राच्या अंगणात पडत आहेत. त्या फुलांचा सुगंध महाराष्ट्रभर दरवळत आहे. आपल्या वडिलांच्या संशोधनकार्यात, संदर्भस्थळांच्या पर्यटनात त्या सतत अण्णांबरोबर असत. अण्णांची सर्जनशीलता त्यांची दुसरी कन्या वर्षा गजेंद्रगडकर आणि मुलगा मिलिंद यांच्यात वेगळ्या रूपात वावरताना दिसते. पर्यावरणशास्त्राच्या क्षेत्रात मिलिंदने आपली वेगळी ओळख निर्माण केली आहे. अण्णा नावाच्या महावृक्षाला आयुष्यभर सावली देण्याचे काम दोन माउलींनी केले आहे. एक म्हणजे अण्णांच्या पत्नी इंदुमती ढेरे आणि दुसऱ्या अण्णांच्या भगिनी प्रमिला ढेरे. या दोघींचा उल्लेख केल्याशिवाय अण्णांचा जीवनपरिचय पूर्ण होऊ शकत नाही. अण्णांनी आयुष्यात कधीही नोकरी केली नाही. संशोधनाची आस हीच त्यांची एकमेव इस्टेट होती. अण्णांनी संशोधनाला पूर्णपणे वाहून घेण्याचा निर्णय घेतला. ही एकप्रकारे आनंदाची फकिरीच होती. दुसरी कसलीही आर्थिक आवक नसणाऱ्या अण्णांच्या घराने अण्णांचा पूर्णपणे संशोधनाला वाहून घेण्याचा निर्णय कोणताही गाजावाजा न करता सहज स्वीकारला. घराने अण्णांमधल्या संशोधकाला जगण्यासाठी जवळ असलेला तुटपुंजा पैसा निरुपयोगी गोष्टींवर खर्च करण्याची मुभा दिली. गरजांच्या मागण्या त्यांच्यापर्यंत पोचणार नाहीत याची काळजी घेतली आणि त्यांच्या कामाचे व्यावहारिक भले-बुरे ओझे विनातक्रार आनंदाने वाहिले. हे सारे आम्ही तुमच्यासाठी करतो आहोत, हा आविर्भाव कधी मिरवला नाही. घरातल्या मंडळींच्या या भरभक्कम पाठिंब्यामुळेच अण्णांमधला एकाकी, हळवा माणूस संशोधक म्हणून स्वाभिमानाने उभा राहू शकला.

अण्णांच्या घरात सतत माणसांचा राबता असे. अनेक संशोधक, अभ्यासक, विद्वान आणि व्यासंगी लोक अण्णांना भेटायला येत असत, पण त्याचबरोबर अण्णांवर जिवापाड प्रेम करणारी माणसेही येत असत. त्यांचेही तितक्याच आपुलकीने आणि स्नेहभावाने या घरात स्वागत केले जात असे. अण्णा एखाद्या संशोधकाशी जितक्या आत्मीयतेने बोलत तितक्याच मनोभावे भेटायला येणाऱ्या सामान्य माणसांशीही बोलत. अण्णांनी आयुष्यभर शब्दांचीच रत्ने वापरली. शब्दांची शस्त्रे वापरण्याचा त्यांचा स्वभाव नव्हता. 'जोडोनिया धन' हा व्यवहारही त्यांना कधी जमला नाही. पण 'जोडोनिया जन' या नात्याने त्यांनी स्नेहांकितांची जी मांदियाळी निर्माण केली आहे ती त्यांच्या संशोधनाइतकीच श्रीमंत आहे. याचा प्रत्यय अण्णांच्या वाढदिवसाच्या दिवशी भेटायला येणारी नाना प्रकारची माणसे पाहिल्यानंतर येत असे. अण्णांची संशोधनगुंफा या दिवशी सर्वांसाठी खुली असे. एरवी एकान्तात संशोधनमग्न असणारे अण्णा या दिवशी मात्र गप्पांसाठी वेळ काढत, सर्वांशी भरभरून बोलत.

अण्णांना चहा खूप आवडत असे. अण्णा अक्षरशः 'चहाबाज' होते. जेवणापूर्वी 'ॲपेटायझर' म्हणून आणि जेवणानंतर 'डायजेस्टर' म्हणून चहा घेणारे अण्णा आलेल्या प्रत्येकाला तितक्याच मनापासून चहा घेण्याचा आग्रह करीत असत. त्यांच्या घरात सतत चहा उकळत असे.

आपल्याकडे असे चित्र अनेकदा दिसते, की संशोधक रूक्ष असतात, त्यांच्या मनाला भावनांचे पाझर सहसा फुटत नाहीत. अशी माणसे जीवनातल्या सौंदर्याला पारखी झालेली असतात. त्यामुळे त्यांचे जीवन रूक्ष आणि कोरडे वाटते.

अण्णा मात्र याला अपवाद होते. खवय्येगिरीपासून ते पर्यटनापर्यंतच्या प्रत्येक क्षेत्रात त्यांना रस होता. या महान संशोधकात एक मूल लपलेले होते. ते जपण्याचा प्रयत्न घरातली सगळी माणसे आपापल्या परीने करीत. अण्णांना गोड पदार्थ खूप आवडत, म्हणून घरातले डबे अण्णांना आवडणाऱ्या विविध प्रकारच्या लाडवांनी कायम भरलेले असत.

माझा आणि डॉ. अरुणा ढेरे यांचा अनेकदा व्याख्यानाच्या निमित्ताने मिळून प्रवास होतो. कार्यक्रमाहून घरी परत येताना त्या अण्णांसाठी हमखास त्यांच्या आवडींचा अथवा त्या गावात प्रसिद्ध असलेला पदार्थ घेऊन यायच्या. कारण घरी आल्यानंतर 'काय आणलंस खाण्यासाठी?' असा अण्णांचा भाबडा, एखाद्या निरागस निष्पाप मुलासारखा प्रश्न असायचा.

महाराष्ट्र शासनाचा पहिला 'ज्ञानोबा-तुकोबा' पुरस्कार अण्णांना जाहीर झाला. मुख्यमंत्र्यांच्या स्वीय सहायकाचा फोन ढेऱ्यांच्या घरी आला. त्यांनी ही आनंदवार्ता डॉ. अरुणा ढेरे यांना फोनवर सांगितली. त्या वेळी अण्णा त्यांच्या अभ्यासिकेत बसून लेखन करीत होते. ही आनंदाची बातमी अरुणाताईंनी अण्णांना सांगितली. क्षणभर त्यांना बरे वाटले. दुसऱ्या क्षणी ते चिंताक्रांत झाले. कारण आता पुरस्कार जाहीर झाल्यामुळे वृत्तपत्रांत त्याच्या बातम्या येणार, लोकांचे अभिनंदनाचे फोन येणार, माणसे भेटायला येणार, समारंभात वेळ जाणार आणि या साऱ्या गोंधळात जो संशोधन प्रकल्प हाती घेतला आहे त्यासाठी वेळ देता येणार नाही, यामुळे अण्णा अस्वस्थ झाले होते. असा विचार केवळ अण्णाच करू शकतात.

पदव्युत्तर परीक्षा न देता संशोधन पदवी मिळणाऱ्या अपवादभूत अभ्यासकांपेकी अण्णा एक होते. पुणे विद्यापीठाने त्यांना पीएच.डी. पदवी दिलीच. पुढे डी. लिट. ही दिली. देतानाही धन्यता मानली. डेक्कन कॉलेज अभिमत विद्यपीठानेही त्यांना डी.लिट. दिली. भारती विद्यापीठ विश्वविद्यालयाने त्यांचा 'जीवनसाधना गौरव' पुरस्कार देऊन सन्मान केला. साहित्य अकादमीचा पुरस्कार, महाराष्ट्र फौंडेशनचा जीवनगौरव पुरस्कार, साहित्य संस्कृती मंडळाची गौरववृत्ती असे अनेक सन्मान त्यांना लाभले. या पुरस्कारांमुळे पुरस्कारांचीच उंची वाढली.

कथाकार जी. ए. कुलकर्णी यांच्या कुटुंबीयांनी अण्णांना 'प्रिय जी. ए. सन्मान' देण्याचे ठरविले. जीएंच्या भगिनी नंदाताई पैठणकर यांच्या आग्रहास्तव अण्णांनी हा पुरस्कार स्वीकारला. ज्येष्ठ साहित्यिक मधु मंगेश कर्णिक यांच्या हस्ते हा सन्मान अण्णांना पुण्यात देण्यात आला. या समारंभात अण्णांचा परिचय करून देण्याची अवघड जबाबदारी माझ्यावर होती. मी भाषणात म्हणालो, "कथाकार जीएंच्या नावे असलेला सन्मान संशोधक अण्णांना कसा काय, असा प्रश्न आपल्यापैकी अनेकांच्या मनात आला असेल. अण्णा आणि बाबूअण्णा (जीए) यांना जोडणारी काही समान सूत्रे आहेत. इथली माती, माणसे, लोकश्रद्धा आणि संस्कृती ही जीएंच्या कथांमधली मूलद्रव्ये आहेत व त्यालाच मूलाधार मानून अण्णा संशोधन करीत आले आहेत. सर्जनशीलता हे अण्णा आणि बाबूअण्णा यांना जोडणारे पहिले सूत्र आहे. दोघेही सार्वजनिक सभा, समारंभ आणि संमेलनापासून दूर राहून नवनिर्मितीचे काम करीत राहिले. 'दास डोंगरी राहतो। यात्रा देवाची पाहतो।' याच भावनेने दोघेही निर्मितीलाच देव मानून सर्जनाची यात्रा, उत्सव पाहत आलेले आहेत.' अण्णांना 'प्रिय जीए' सन्मान दिला जात असताना संपूर्णपणे सभागृहाने उभे राहून टाळ्यांच्या कडकडाटात अण्णांना मानवंदना दिली.

आयुष्य पणाला लावून निष्ठेने संशोधन करणारे खंबीर अण्णा, कर्तृत्वाच्या सन्मानार्थ समाजाने आणि शासनाने दिलेले सन्मान मोठ्या संकोचाने स्वीकारणारे अण्णा, दिवंगत स्नेहीजनांच्या नुसत्या आठवणीनेदेखील गहिवरणारे अण्णा, नातवंडांत मूल होऊन रमणारे अण्णा, समोरच्या माणसांचे दुःखभोग ऐकताना आसवांनी भरलेले डोळे पुसणारे अण्णा, अशी अण्णांची विविध रूपे मी जवळून पाहिली. ती सारीच मनोहारी होती. ती डोळ्यांत साठवून आठवत राहण्यात नामस्मरणाचा आनंद मिळतो.

'आपुला तो एक, देव करोनि घ्यावा। या संतवचनाप्रमाणे ज्ञानसाधनेतच अण्णा देव शोधत आले आहेत. देवदेवतांच्या संशोधनात रमणाऱ्या अण्णांच्या व्यक्तिमत्त्वात देवत्व पुरते भिनले होते. त्यामुळेच त्यांना भेटल्यावर देव भेटल्याचा आनंद मिळायचा आणि भक्तिभावाने त्यांच्या पायाशी बसण्यात धन्यता वाटायची. आता तो आनंद हिरावलाय.

◆

**प्रा. मिलिंद जोशी**
बी १/१२, रविराज टेरेस,
सुखसागरनगर, कात्रज, पुणे ४११०४६
चलभाष : ९८५०२७०८२३
joshi.milind23@gmail.com



लेख

कृ. पं. देशपांडे

# जें विरहिणीचां मनीं वसें...



**लेखन करीत असताना संघर्षाचे काही प्रसंग येतात. प्रस्थापित मतांविरुद्ध मते मांडल्यावर काही वेळा त्यांना तोंड द्यावे लागतेच, पण काही वेळा अगदी साध्या साध्या गोष्टींवरूनही ते येतात. काही लोकांच्या भावना इतक्या टोकदार झालेल्या असतात, की एखाद-दुसरा शब्द जरी कमी-जास्त झाला तरी त्या लगेच दुखावल्या जातात. काही वेळा अगदी हीन पातळीवर जाऊन बोचरी टीका होते. नवख्या संशोधकाला अशा टीकेचा अनुभव नसतो. प्रारंभीच्या काळात झालेल्या अशा टीकेमुळे तो खचून जाऊ नये म्हणून त्याला धीर देणे, मानसिक बळ देणे आवश्यक असते. मलाही दोन-तीन वेळा हा अनुभव आला होता. त्या सर्व वेळेला अण्णा माझ्या पाठीशी ठामपणे उभे राहिले होते.**





अण्णा गेले! पंधरा-वीस दिवस होऊन गेले तरी मन अजून अस्वस्थ होते. असा एकही दिवस जात नाही की ज्या दिवशी त्यांची आठवण येत नाही. आठवणींनी मन सैरभैर होते. डोळे पाणावतात. उणापुरा पन्नास वर्षांचा ऋणानुबंध. या प्रदीर्घ काळातील सहवासात अण्णा किती तरी नात्यांनी जवळ आले होते. केवळ माझ्याच नाही तर माझ्या सर्व कुटुंबाच्याच. कुटुंबातील एक ज्येष्ठ, आदरणीय घटक बनून गेले होते. म्हणूनच आज ते नाहीत ही कल्पनाच मनाला असह्य होते.

त्यांचा परिचय झाला तो १९६७ साली. एका पुस्तकाच्या निमित्ताने. त्या वेळी मी पीएच. डी. करायचे ठरविले होते. विद्यापीठाने 'मराठी भारूड' हा विषय सुचविला होता. त्या संदर्भातले एक पुस्तक बऱ्याच प्रयत्नांती मिळत नव्हते. मी त्याबद्दल माझे ज्येष्ठ मित्र डॉ. विनायकराव कुलकर्णी यांच्याशी बोललो. ते लगेच म्हणाले, ''रामकडे मिळेल.'' मला उलगडा होईना. माझ्याकडे पाहत ते म्हणाले, ''राम म्हणजे रा. चिं. ढेरे!'' अण्णांची आणि त्यांची मैत्री 'अरे-तुरे'तील होती. ''उद्या सकाळी नऊच्या सुमारास या, म्हणजे ते खोलीवर जाताना भेटतील.'' त्या वेळी आम्ही तिघेही शनिवार पेठेत राहत होतो. एकमेकांच्या अगदी जवळ. हाकेच्या अंतरावर. दुसऱ्या दिवशी सकाळीच गेलो. आम्ही दोघेही विनायकरावांच्या घराच्या शेजारच्या बोळातून बाहेर पडलो, तो अण्णाही खोलीवर जाण्यासाठी त्यांच्या घराच्या (७७ शनिवारच्या) मोठ्या दारातून बाहेरच पडत होते. पायजमा, नेहरू शर्ट, खांद्यावर शबनम पिशवी. प्रसन्न, तेजस्वी चेहरा. हे त्यांचे पहिले दर्शन. विनायकरावांनी त्यांना थांबवून माझी ओळख करून दिली. हव्या असलेल्या ग्रंथाबद्दल सांगितले. माझ्याकडे पाहत अण्णा म्हणाले, ''खरं म्हणजे मी माझी पुस्तके कोणाला देत नाही, पण तुम्ही विनायकरावांच्याकडून आलात म्हणून देतो. पुस्तक नीट

वापरा, त्याला कव्हर घाला आणि काम संपले की लगेच परत करा.'' त्या एकाच वाक्यातून मित्राच्या शब्दाला दिलेला मान, पुस्तकांबद्दलची काळजी अशा किती तरी गोष्टी लक्षात आल्या. त्यांनी पुस्तक दिले. मीही काम झाल्यावर लगेच ते परत केले.

पुस्तक देण्याच्या निमित्ताने मी घरी गेलो. त्यांनी माझ्या पीएच.डी.च्या विषयाची चौकशी केली आणि सांगितले, ''ह्या विषयावर औरंगाबाद विद्यापीठात संशोधन चालू आहे. तुम्ही विद्यापीठाला विचारा, पण हा विषय तुम्हाला घेता येणार नाही.'' विद्यापीठाला सांगितल्यावर अर्थातच तो विषय मला मिळाला नाही.

अण्णांच्या घरी अधूनमधून जाणे चालू होते. बोलणे होत होते. त्या सुरुवातीच्या काळातही ते आपुलकीने, जिव्हाळ्याने बोलत असत. का कोणास ठाऊक पण त्यांच्या घरी पुन्हा पुन्हा जावेसे वाटायचे. मनाला प्रसन्नता लाभायची. पवित्र मंदिरात गेल्यासारखे वाटायचे. आपुलकीचे, प्रेमाचे बंध गुंफले जात होते.

माझा पीएच. डी.चा प्रयत्न चालूच होता. दरम्यानच्या काळात विद्यापीठातले मराठी विभागप्रमुख बदलले. त्या पदवीकरिता मुलाखती घेतल्या गेल्या. मला 'मराठी रामायणातील रामचरित्राचे अवतार' असा विषय घ्यायचा होता. विषय सांगितल्यावर सरांनी 'समर्थ सांप्रदायिकांचा राम' या विषयावर शोधनिबंध लिहून आणायला सांगितला. तो सादर केला; पण माझे एम. ए.ला संस्कृत नाही म्हणून हा विषयही मला मिळाला नाही. गाइड ठरले. डॉ. मु. श्री. कानडे यांच्याकडे मला सोपविण्यात आले. मी 'महानुभावांचे साती ग्रंथ' हा विषय सुचविला; पण इथेही पुन्हा अडचण आली. सरांनी सांगितले, ''डॉ. ढेरे या विषयावर ग्रंथ लिहिणार आहेत. तुलना होईल. तेव्हा तुम्ही दुसरा विषय निवडा.'' अण्णांना हे सांगितल्यावर ते म्हणाले, ''तुम्ही हा विषय घेणार असलात तर मी या विषयावर लिहिणार नाही.'' एवढेच नाही, तर अण्णांनी कानडे सरांची गाठ घेतली आणि त्यांनाही हे सांगितले. ही गोष्ट इथेच संपत नाही. विद्यापीठाने या विषयाला परवानगी दिल्यावर अण्णांनी विषयासंबंधात मार्गदर्शन तर केलेच, पण पहिल्या तीन प्रकरणांचे मुद्दे, त्यासाठी लागणाऱ्या संदर्भ- ग्रंथांची यादीही एकाच बैठकीत करून दिली. किती तरी वेळा त्यांनी लागतील ती पुस्तके मला दिली. कित्येकदा तर ते स्वतः पुस्तके घरी आणून द्यायचे. मलाच अपराध्यासारखे वाटायचे. ''अण्णा, तुम्ही कशाला आणलीत? मी खालीवर आलो असतो ना...'' असे म्हटले की म्हणायचे, ''इथूनच जाणार होतो, म्हणून आणली.'' आजारी पडायच्या अगोदर काही दिवस मी घरी गेलो असताना क्रांतिकारकांच्यावरची काही पुस्तके मला देऊन म्हणाले, ''तुमचा विषय आहे, तुमच्याकडेच ठेवा. मला लागणार नाहीत.'' त्यात 'पाञ्चजन्य' या हिंदी मासिकाचा अत्यंत दुर्मिळ असा 'बिर्सा मुंडा'वरील विशेषांक होता.

प्रबंध सादर केल्यानंतर यथावकाश मला पदवी मिळाली. त्या वर्षीच्या सर्वोत्कृष्ट प्रबंधाची तीन पारितोषिके मिळाली. त्यातले एक उशिरा जाहीर झाले. पण पहिली दोन पारितोषिके जाहीर होताच अण्णा अभिनंदन करायला पेढ्यांचा पुडा घेऊन घरी आले आणि 'देशपांड्यांच्या प्रबंधाचा दुहेरी गौरव' या शीर्षकाची बातमी स्वतः तयार करून ती वर्तमानपत्रांना दिली. उदार, मोठ्या मनाची केवढी ही साक्ष!

मी शनिवार पेठेतून नारायण पेठेत राहायला आलो होतो. माती गणपतीजवळ. अण्णांच्या अभ्यासिकेत जाणारा रस्ता माझ्या घरावरूनच जात होता. त्यामुळे अभ्यासिकेत जाताना ते एक-दोन दिवसाआड तरी घरी यायचे. कित्येकदा रोजच गाठी पडायच्या. त्यांच्याबरोबर त्यांचे मित्र मोरेश्वर वाळिंबे हेही असायचे. घरी तीन खोल्या होत्या. त्यात दोन खोल्या, मग पॅसेज आणि एक स्वतंत्र खोली अशी रचना होती. ही तिसरी खोली स्वतंत्र असल्याने मला अभ्यासाला, लेखनाला फारच सोयीची होती. तेथे मग ते थोडा वेळ थांबायचे. गप्पा व्हायच्या. चहा व्हायचा. मग दोघेही बाहेर पडायचे. सुरुवातीला कधी तरी आणि मग बऱ्याच वेळा मीही त्यांच्याबरोबर बाहेर जात असे. कधी त्यांच्या अभ्यासिकेत तर कधी जुन्या पुस्तकांच्या शोधात... जिमखाना, लक्ष्मी रोडवर बसलेल्या जुन्या पुस्तकविक्रेत्यांकडे.

अण्णांचे पुस्तकवेड सर्वश्रुत आहे. त्यांच्याबरोबर जाता जाता मलाही जुनी पुस्तके पाहायची, विकत घ्यायची सवय लागली. आपण ज्या विषयावर लेखन करतो त्या विषयासंबंधी सर्व पुस्तके आपल्या संग्रही असली पाहिजेत, हा त्यांचा कटाक्ष असायचा. आवश्यकता भासल्यास केव्हाही, अगदी रात्रीसुद्धा आपल्याला संदर्भ पाहता आला पाहिजे, ही त्यापाठीमागची भूमिका असायची. मलाही ही



अनुक्रमणिका

भूमिका पटली. त्यातूनच माझ्या लेखनाविषयी संबंधित नवी-जुनी पुस्तके मीही मिळवू लागलो. माझ्याकडेही चारएक हजारांचा ग्रंथसंग्रह तयार झाला. त्यातील अनेक दुर्मिळ पुस्तके मला रस्त्यावरील जुन्या पुस्तकविक्रेत्यांकडे मिळाली होती. पुढे-मागे लेखनाला उपयोगी पडतील अशी काही पुस्तके अण्णांनीही सुचविली होती. थोरांच्या सहवासात आपल्यातही कसा कळत-नकळत विधायक बदल होत जातो याचा अनुभव मला येत होता.

रसाळ, ओघवती वाणी आणि विषयाचे सखोल ज्ञान असूनही अण्णा कधी व्याख्याने देत नव्हते. (अपवादात्मक जी व्याख्याने दिली ती लिखित स्वरूपाची होती.) एकदा घरी बोलता बोलता ते म्हणाले होते, "व्याख्यानात श्रोत्यांच्या प्रतिक्रिया लगेचच मिळतात, दाद लगेचच मिळते आणि मग त्या मोहात पडले की लेखन, संशोधन बाजूला पडते. त्यामुळे मी व्याख्याने टाळतो." त्यांचा तो विचार माझ्या प्रकृतिधर्माला मानवणारा होता. मलाही सभा-संमेलनात सहभागी व्हायला, मिरवायला फारसे आवडत नाही. शांतपणे आपले काम करीत बसावे हे अधिक आवडते. तो काळ माझ्या लेखनाच्या, नोकरीच्या सुरुवातीचा काळ होता. मलाही असे वाटले, की आपणही आपल्या प्रकृतिधर्मानुसार लेखनच करीत राहावे. व्याख्याने टाळावीत. त्यामुळे मी अध्यापक असूनही जाहीर भाषणे कोठे दिली नाहीत, देतही नाहीत. सातत्याने गेली पन्नास-बावन्न वर्षे लेखन करीत राहिलो.

त्या काळात अण्णांच्या घरीही संध्याकाळच्या वेळेला अनेकदा जाणे व्हायचे. शनिवारातल्या त्या घरात दारातून आत गेले की डाव्या बाजूच्या भिंतीला एक उंच कॉट होती. त्यावर तक्क्या ठेवलेला असायचा. दाराला लागून डाव्या हाताला एक खुर्ची आणि कॉटसमोर, उजव्या हाताच्या भिंतीशी दोन खुर्च्या असायच्या. गेल्यावर मग थोडेसे इकडचे तिकडचे बोलणे झाले की मग अण्णा वेगवेगळ्या विषयांवर बोलायचे. माहिती, ज्ञानाची ती पर्वणीच असायची. त्यांचे बोलणे फार सावधानतेने ऐकायला लागायचे. थोडेसे जरी दुर्लक्ष झाले तरी नंतरचे बोलणे, संदर्भ भाग त्यांनी मला आधीच सांगितला होता. अशा स्वरूपाचे बोलणे चालू असताना कित्येकदा अण्णांचे एक अगदी जवळचे मित्र नाना जोशीही तेथे असायचे. एकदा तर नवीन संशोधन सांगत असताना ते अण्णांना म्हणालेही, "राम, अरे सगळ्या गोष्टी त्यांना काय सांगतोस?... तुला अनुभव काय कमी आलेत...?" ते ऐकून अण्णा लगेच म्हणाले, "मला खात्री आहे म्हणूनच मी बोलतोय." एकदा 'आपलं' म्हटल्यावर माझ्यावर केवढा विश्वास दाखवला होता त्यांनी!

ग्रंथातून संशोधन प्रकाशित होण्यापूर्वी अण्णांच्यासारख्या महान संशोधकाच्या मुखातून बराच भाग आधीच ऐकायला मिळणे ह्याला खरोखर भाग्यच असावे लागते. ते भाग्य मला लाभले होते. आणखीही एक भाग्य मला लाभले होते त्यांनी त्यांचे किती तरी ग्रंथ मला भेट दिले होते, पण 'प्राचीन मराठी वाङ्मय : शोध आणि संहिता' या ग्रंथाची अर्पणपत्रिकाच मला केली होती. अण्णांनी जेव्हा स्वाक्षरी करून ते पुस्तक माझ्या हातात दिले, तेव्हा ते पाहून मन भारावून गेले, डोळे पाणावले नि शब्द मुकेच झाले.

एक चालता-बोलता विश्वकोश माझ्या जवळ होता. मला केव्हाही उपलब्ध होता. आता काही वेळा वाटते, त्यांच्या पायाशी बसून संशोधनाचे काही धडे गिरवले असते तर बरे झाले असते. त्यांनी एक-दोन ग्रंथांचे संपादन करायला सांगितले होते, पण माझ्याकडून ते झाले नाही. त्या काळात शैक्षणिक लेखन, कुमार वाङ्मय, ललित लेखन मी करीत राहिलो. अनेक वर्षे नोकरीतील कटकटीत नि मनस्तापात गेली. त्यामुळे ती संपादने मागे पडली ती मागेच पडली. आणि दुसरे असे, की संशोधनाचा हा प्रांत सोपाही नाही. ध्यास, अभ्यास आणि प्रतिभा यांचे संवादी सूर जुळले तर हाती काही लागते. नदीचा विशाल प्रवाह वाहत असताना आपल्या हाती जे पात्र असते तेवढेच पाणी आपण घेऊ शकतो. ती आपली मर्यादा असते. पण एका गोष्टीची खंत मात्र गेले अनेक दिवस वाटत आली आहे. ती मी घरी, माझे मित्र श्रीराम कानडे यांच्याकडेही अनेकदा बोललो आहे. मला डायरी लिहिण्याची सवय असती तर फार बरे झाले असते असे वाटते. अण्णा अनेक विषयांवर बोलायचे. संदर्भ द्यायचे, विषय सुचवायचे. मला जर डायरीची सवय असती आणि त्या त्या वेळी मी ते विषय लिहून ठेवले असते तर संशोधनाचे शेकडो विषय उपलब्ध झाले असते. भावी संशोधकांना अनेक वर्षे ते पुरले असते, मार्गदर्शक ठरले असते. पण जर-तरच्या गोष्टींना काही अर्थ नसतो. ती सवय नसल्यामुळे फार नुकसान झाले असे वाटते.

लेखन करीत असताना संघर्षाचे काही प्रसंग येतात. प्रस्थापित मतांविरुद्ध मते मांडल्यावर काही वेळा त्यांना तोंड

द्यावे लागतेच, पण काही वेळा अगदी साध्या साध्या गोष्टींवरूनही ते येतात. काही लोकांच्या भावना इतक्या टोकदार झालेल्या असतात, की एखाद-दुसरा शब्द जरी कमी-जास्त झाला तरी त्या लगेच दुखावल्या जातात. काही वेळा अगदी हीन पातळीवर जाऊन बोचरी टीका होते. नवख्या संशोधकाला अशा टीकेचा अनुभव नसतो. प्रारंभीच्या काळात झालेल्या अशा टीकेमुळे तो खचून जाऊ नये म्हणून त्याला धीर देणे, मानसिक बळ देणे आवश्यक असते. मलाही दोन-तीन वेळा हा अनुभव आला होता. त्या सर्व वेळेला अण्णा माझ्या पाठीशी ठामपणे उभे राहिले होते.

आजवरच्या माझ्या साऱ्याच लेखनप्रवासात त्यांचे विविधांगी साहाय्य झाले होते. त्यामुळेच आज त्यांच्या नसण्याने आधारवडच कोसळल्यासारखे वाटते.

अनेक वर्षांच्या सहवासाने आमच्या दोन्ही कुटुंबांचे अगदी घरगुती नाते निर्माण झाले होते. घरी गेल्यावर आधी आमच्या घरातील सगळ्यांची विचारपूस व्हायची आणि मग इतर बोलण्याला सुरुवात. जीवनाच्या वाटचालीत कित्येकदा मोठी संकटे येतात. त्यांना सामोरे जाताना मन सैरभैर होते. काय करावे काही सुचत नाही. मार्गही सापडत नाही. अशा वेळी अण्णांचा फार मोठा आधार वाटायचा. मन मोकळे करायची ती एक माझ्या हक्काची जागा होती. त्यांच्या धीर देणाऱ्या शब्दांनी संकटांचा सामना करायची उमेद यायची, वाटचाल सुकर व्हायची. माझ्या आणि माझ्या भावाच्या जीवनात एक-दोन प्रसंग असे आले होते, की ज्यावेळी मन उद्ध्वस्त व्हायची वेळ आली होती. त्या वेळी त्यांच्या आधारामुळेच मी सावरला गेलो होतो. पुन्हा उभे राहता आले होते. घरातील एक वडीलधारी व्यक्ती म्हणून मला त्यांचा फार मोठा आधार होता. त्यांच्या वाढदिवसानंतरही काही दिवस त्यांना शुभेच्छा देण्यासाठी चाहत्यांची ये-जा चालू असायची. त्या दिवशी बहुतेक साऱ्या वृत्तपत्रांतूनही त्यांचे मनोगत व्यक्त झालेले असायचे. तेही काही नवीन विचार व्यक्त करणारे असायचे. वाढदिवसाच्या दिवशी सकाळपासूनच हितचिंतक, मित्र, नातेवाईक यांनी घर कसे भरलेले असायचे. पांढरा स्वच्छ पायजमा, फिकट निळ्या किंवा पिवळसर रंगाचा नेहरूशर्ट, भव्य तेजस्वी कपाळावर रेखलेला कुंकुमतिलक, प्रसन्न हसरी मुद्रा. हसऱ्या मुद्रेने ते आलेल्यांचे स्वागत करायचे. हास्यविनोदात गप्पा चाललेल्या असायच्या. प्रसन्नतेचा एक अनोखा अनुभव यायचा.

वाढदिवसाच्या निमित्ताने आठवण झाली. माझा नातू मृगेंद्र लहान होता. असेल तीन-चार वर्षांचा. घरात अण्णांचा, त्यांच्या घरातील इतरांचा नेहमीच काही ना काही कारणाने उल्लेख होत असे. ते त्याने अनेकदा ऐकले होते. त्या वर्षी आम्ही वाढदिवसाच्या दिवशी त्यांच्या घरी जाऊन आल्यानंतर त्यासंबंधी बोलणे निघाले. ते त्याने ऐकल्यावर त्यांच्याकडे जाण्याचा तो हट्टच धरून बसला. काही केल्या त्याची समजूत पटेना. रात्रीचे नऊ वाजून गेले होते. अखेर अनंता त्याला घेऊन त्यांच्या घरी गेला. त्यांनीही त्याला मांडीवर घेतले. ते त्याच्याशी बोलले. मांडीवर बसवूनच त्याचा फोटो काढला. आणि मग त्याला घरी आणले.

अलीकडच्या काही वर्षांत, दरवर्षी त्यांच्या वाढदिवसाला त्यांचा एक नवीन ग्रंथ पद्मगंधा प्रकाशनातर्फे प्रकाशित व्हायचा. प्रकाशन सोहळा घरगुतीच असायचा, पण त्या निमित्ताने काही मान्यवर यायचे. त्यांचेही विचार ऐकायला मिळायचे नि दुधात साखर पडायची. वाढदिवसाच्या दिवशी ग्रंथप्रकाशन हे अगदी गेल्या वर्षीपर्यंत होत होते. गेल्या वर्षीही त्यांची तीन पुस्तके प्रकाशित झाली होती. या वर्षीही नृसिंहावरचा ग्रंथ प्रकाशित होणार होता. त्याची तयारीही झाली होती; पण तो योग नव्हता.

अण्णा गेली दोन-सव्वादोन वर्षे अर्धांगाने आजारी होते. त्यामुळे त्यांच्या हालचाली मंदावल्या होत्या. परस्वाधीनता आली होती. मदतीशिवाय उठून बसताही येत नव्हते. या काळात दोन एक महिन्यांनी त्यांच्याकडे जाणे व्हायचे, पण पूर्वीची प्रसन्नता राहिली नव्हती. वहिनी आणि माईही थकलेल्या. ऐंशीच्या पुढची त्यांचीही वयं. त्यात वयोमानाने आलेली दुखणी. माईंच्या गुडघ्याचे ऑपरेशन झालेले. एक प्रकारची उदासीनतेची छाया जाणवायची. गोकुळात सांज येऊ लागली आहे असे वाटायचे. पूर्वीसारखे बोलणे व्हायचे नाही. मलाही ऐकायला थोडे कमी येऊ लागल्याने खुर्ची घेऊन अगदी अण्णांच्या जवळ बसलो तरी त्यांचे शब्द मला समजायचे नाहीत. मग काही वेळा वहिनी तर काही वेळा अरुणा त्यांचे म्हणणे सांगायची. संवाद राहिला नाही. वाईट वाटायचे, पण काही इलाज नव्हता. मग बऱ्याचदा माई किंवा वहिनीच बोलत बसायच्या.

२१ जुलैला त्यांचा ८६ वा वाढदिवस होता. त्याची तयारी चालली होती. अण्णांच्या ग्रंथसंग्रहाचा ट्रस्ट केला

होता. संशोधक, अभ्यासकांना ती सारी ग्रंथसंपदा उपलब्ध होणार होती. त्याच्या उद्‌घाटनानिमित्ताने २३ जुलैला टिळक स्मारक मंदिरात मोठा कार्यक्रम आयोजित केला होता. मा. मुख्यमंत्री येणार होते. प्रसिद्ध कन्नड साहित्यिक भैरप्पा येणार होते. त्याच समारंभात त्यांच्या 'नृसिंह' या नवीन ग्रंथाचे प्रकाशनही होणार होते. ग्रंथछपाई अखेरच्या टप्प्यात होती. ३० जूनला रात्री नऊ-साडेनऊपर्यंत प्रकाशक अरुण जाखडे त्यांच्याकडे बसले होते. काही शंकांचे निरसन करून घेत होते. अण्णा इतके आजारी होते तरी अखेरपर्यंत त्यांची स्मरणशक्ती उत्तम होती. त्यांनी जाखड्यांच्या सर्व शंकाचे निरसन केले. एका अर्थाने ग्रंथाची पूर्तता झाली, पण २३ तारखेला प्रकाशनाचा योग नव्हता.

एक तारीख उजाडली तीच अण्णा गेल्याची बातमी घेऊन. दूरदर्शनवरील बातमी पाहिली आणि हातापायांतले अवसानच गळून गेल्यासारखे झाले. काही समजेनासेच झाले. पण ते कटू सत्य होते. आवरून लगेच त्यांच्या घरी गेलो. बोळात वळतानाच पाय जड झाले, डोळे पाणावले, पाऊल पुढे टाकताच येईना. त्यांचे अंत्यदर्शन घेताना मनात दाटून आलेल्या भावना शब्दांत कशा सांगणार? दहा-साडेदहाच्या सुमारास अंत्यदर्शनासाठी काही वेळ साहित्य परिषदेत न्यायचे होते. ॲम्ब्युलन्स आली होती. त्यांना खाली आणले. कोणी तरी 'आम्ही जातो अमुच्या गावा' हा अभंग म्हणायला सुरुवात केली. 'तुमची आमची हेचि भेटी : येथूनिया जन्मतुटी' ही ओळ ऐकताना तर मन गलबलून गेले. इतक्या दिवसांनीही त्यांच्या आठवणींनी मन भरून येते, अस्वस्थता जाणवते. महाकवी नरेंद्राची एक ओवी आठवते,

जें विरहिणीचां मनीं वसें: तें बोलतां होए आनारिसें
तें वाचितां ये रस-डोळसें : भाव-लिखित

◆

कृ. पं. देशपांडे
प्रभा को. हौ. सोसायटी, पौड रोड,
कोथरूड, पुणे ४११ ०३८
फोन : (०२०) २५४६६३०७

# डॉ. रा. चिं. ढेरे वाङ्मयसूची

- **स्वतंत्र व अनुवादित पुस्तके आणि संपादने**

१. **सरदार वल्लभभाई**
ज्योती प्रकाशन, पुणे, १९५०.
(सरदार वल्लभभाई पटेलांचे लघुचरित्र)

२. **श्रीनरसिंह सरस्वती : चरित्र आणि परंपरा**
वोरा अँड कंपनी, मुंबई, १९५८.
द्वितीयावृत्ती **'दत्त संप्रदायाचा इतिहास'** या नावाने.,
नीलकंठ प्रकाशन, पुणे. १९६४.
(सर्व भारतीय भाषांत या विषयावरील एकमेव प्रमाणभूत ग्रंथ.)

३. **कृष्णदयार्णवकृत हरिवरदा (संपादन)**
खंड ४ था, १९५८.

४. खंड ५ वा, १९५९.

५. खंड ६ वा, १९६०.

६. खंड ७ वा, १९६१.

७. खंड ८ वा, १९६२.
द.र. कोपर्डेकर प्रकाशन, पुणे.

८. **महात्मा चक्रधर**
व्हीनस प्रकाशन, पुणे, १९५८.
(आबालसुबोध छोटी चरित्रकहाणी)

९. **तुका झालासे कळस (देहू)**
वोरा अँड कं., मुंबई, १८५८.

१०. **ज्ञानोबा माऊली** (आळंदी)
वोरा अँड कं., मुंबई, १९५८.

११. **मंगलमूर्ती मोरया** (मोरगाव-चिंचवड)
वोरा अँड कं., मुंबई, १९५८.

१२. **एका जनार्दनी** (पैठण)
वोरा अँड कं., मुंबई, १९५८.

१३. **श्रीगुरुदेव दत्त** (औदुंबर-नरसोबाची वाडी)
वोरा अँड कं., मुंबई, १९५८.

१४. **श्रीगुरूंचे गंधर्वपूर** (गाणगापूर)
वोरा अँड कं., मुंबई, १९५८.

१५. **श्रीगोदे, भवताप हरी** (नाशिक-त्र्यंबकेश्वर)
वोरा अँड कं., मुंबई, १९५८.

१६. **दलितांचा कैवारी भार्गवराम** (परशुराम क्षेत्र)
वोरा अँड कं., मुंबई, १९५८.

१७. **श्रीगुरू गोरक्षनाथ : चरित्र आणि परंपरा**
वोरा अँड कं., मुंबई, १९५८.
(मराठी नाथपरंपरेच्या मौलिक संशोधनाने युक्त असा प्रस्तुत विषयावरील मराठीतील आद्य ग्रंथ)

१८. **भक्तिवेडी बहिणा**
वोरा अँड कं., मुंबई, १९५८.
(संत बहिणाबाईचे लघुचरित्र)

१९. **प्रवासी पंडित**
वोरा अँड कं., मुंबई, १९५८.
(ह्युएन त्संगाच्या भारतयात्रेची कहाणी)

२०. **अमृतकन्या**
सरस्वती प्रकाशन, पुणे, १९५९.
द्वितीयावृत्ती : इंद्रायणी साहित्य, पुणे, १९५९.
तृतीयावृत्ती : इंद्रायणी साहित्य, पुणे, १९७५.
(संस्कृत वाङ्मयातील आठ स्त्रीचित्रे)

२१. **तेजस्वी धर्मोद्धारक**
वोरा अँड कं., मुंबई, १९६०.
(शंकराचार्यांचे लघुचरित्र)

२२. **नृपनिर्माता चाणक्य**
वोरा अँड कं., मुंबई, १९६०.
(चाणक्याचा प्रबोधक लघुपरिचय)

२३. **नामयाची जनी**
वोरा अँड कं., मुंबई, १९६०.
(संत जनाबाईंच्या जीवनाचे, साधनेचे व कवितेचे हृदयंगम दर्शन. १०० निवडक वर्गीकृत अभंगांसह)

२४. **बारावे ज्योतिर्लिंग** (वेरूळ)
वोरा अँड कं., मुंबई, १९६०.

२५. **नागेशं दारुकावने** (औंढ्या-नागनाथ)
वोरा अँड कं., मुंबई, १९६०.

२६. **योगेश्वरीचे माहेर** (आंबेजोगाई)
वोरा अँड कं., मुंबई, १९६०.

२७. **मातापूरची जगन्माता** (माहूर)
वोरा अँड कं., मुंबई, १९६०.

२८. **क्षिप्रेच्या सोनेरी स्मृती** (उज्जयिनी)
वोरा अँड कं., मुंबई, १९६०.

२९. **जागृत जगन्नाथ** (जगन्नाथपुरी)
वोरा अँड कं., मुंबई, १९६०.

३०. **त्रिभुवनेश्वर लिंगराज** (भुवनेश्वर)
वोरा अँड कं., मुंबई, १९६०.
(क्र. ९ ते १६ व २४ ते ३० या पंधरा पुस्तिकांत स्थलपरिचयाला सांस्कृतिक इतिहासाची बैठक आहे. या पुस्तिकांच्या अनेक आवृत्त्या निघाल्या आहेत.)

३१. **रामचंद्रपंत अमात्यप्रणीत स्वराज्यनीती : आज्ञापत्र**
वोरा अँड कं., मुंबई, १९६०.
(प्रा. प्र. पं. जोशी यांच्या सहयोगाने)

३२. **श्रीशिवशान्तस्तोत्रतिलकम्**
श्रीदत्ताबुवा रामदासी, श्रीधरकुटी, सज्जनगड, १९६०.
(श्रीधरस्वामींचे श्लोकबद्ध संस्कृत शिवस्तोत्र)
(भाषांतर व संपादन : प्रा. प्र. पं. जोशी यांच्या सहयोगाने)

३३. **समाजरचना आणि विवेकनिष्ठा** (संपादन)
महाराष्ट्र हरिजन सेवक संघ, धुळे, १९६०.
(श्री. वि. न. ऊर्फ काकासाहेब बर्वे यांचे 'दलितसेवक'मधील लेख)

३४. **महाराष्ट्र इतिहास दर्शन**
वोरा अँड कं., मुंबई, १९६१.
(श्री. भा. द. खेर व श्री. सुधाकर प्रभू यांच्या सहकार्याने महाराष्ट्राचा गेल्या दोन हजार वर्षांतील इतिहास संक्षेपाने परंतु प्रभावीपणे परिचित करून देण्याचा प्रयत्न)

३५. **श्रीशारदामाता : चरित्र आणि उपदेश**
श्रीविवेकानंद सोसायटी, पुणे, १९६१.
(श्रीशारदामणिदेवी यांच्या दिव्य जीवनाचे व वाणीचे वेधक दर्शन)

३६. **खंडोबा**
देशमुख आणि कं., पुणे, १९६१.
(कर्नाटक-महाराष्ट्रातील प्रख्यात लोकदेवतेचा विकासक्रम उलगडून दाखविण्याचा गंभीर प्रयत्न. लोकसंस्कृतीच्या अध्ययनाच्या विस्तृत क्षितिजांची जाणीव.)

३७. **इंद्रायणी (संपादन)**
द. र. कोपर्डेकर, पुणे.
(मराठी साहित्य आणि संस्कृती या विषयाला वाहिलेले कालिक)
मासिक : नोव्हेंबर १९६२ ते ऑक्टोबर १९६३
(सप्टेंबर व ऑक्टोबर १९६३ जोडअंक) एकूण ११ अंक
द्वैमासिक : नोव्हेंबर १९६३ ते एप्रिल १९६४. एकूण ३ अंक
(केवळ १४ अंक निघाले, परंतु त्यातून प्राचीन आणि मराठी वाङ्मय व संस्कृती यांच्या इतिहासाची विपुल सामग्री उपलब्ध करून दिली.)

३८. **अमृतवाणी** (अनुवाद)
श्रीविवेकानंद सोसायटी, पुणे, १९६३.
('Thus spake Shri Ramkrishna' चा अनुवाद)

३९. **मातृवाणी** (अनुवाद)
श्रीविवेकानंद सोसायटी, पुणे, १९६३.
('Thus Spake The Holy Mother' चा अनुवाद)

४०. **मराठी भक्तिपरंपरा आणि श्रीरामकृष्ण- विवेकानंद** (संपादन)
श्रीविवेकानंद सोसायटी, पुणे, १९६३.
(श्रीविवेकानंद (जन्मशताब्दी) स्मृतिग्रंथ. संपादकांचे तीन लेख समाविष्ट)

४१. **श्रीरामकृष्ण संघ : उदय आणि विकास** (संपादन)
श्रीविवेकानंद सोसायटी, पुणे, १९६३.

४२. **इंद्रायणी**
द. र. कोपर्डेकर प्रकाशन, पुणे, १९६३.
पुनर्मुद्रण : इंद्रायणी साहित्य, पुणे, १९७५.
('संत आणि साहित्यिक यांविषयीचे नऊ गौरवलेख.' हे पुस्तक पुढे 'ही चिंरतनाची वाट' आणि 'विराग आणि अनुराग' या दोन पुस्तकांत नव्या अनेक लेखांसह विभागून समाविष्ट.)

४३. **मराठी लोकसंस्कृतीचे उपासक**
ज्ञानराज प्रकाशन, पुणे, १९६४.
(वासुदेव, गोंधळी, भराडी, वाघ्या-मुरळी, बहुरूपी इत्यादी लोकधार्मिक व लोकरंजक सस्थांचा शोधपूर्वक वेधक परिचय)

४४. **संत आणि समाज** (संपादन)
ज्ञानेश्वरी अभ्यास मंडळ, विजापूर, १९६४.
(श्री. काकासाहेब कारखानीस यांचे लेख)

४५. **नरेंद्र-विरचित रुक्मिणी स्वयंवर** (संपादन)
जोशी ब्रदर्स, औरंगाबाद, १९६५.
('महाकवी नरेंद्र : व्यक्ती आणि काव्य' या प्रदीर्घ प्रास्ताविक निबंधात नरेंद्राच्या जीवनाचे व कवितेचे वेधक दर्शन)

४६. **रामराज्याची स्फूर्तिकेंद्रे**
ललितवैभव प्रकाशन, पुणे, १९६६.
पुनर्मुद्रण : इंद्रायणी साहित्य, पुणे, १९७५.
(चाफळचा राम, प्रतापगडची भवानी आणि कृष्णा-कोयना परिसरातील अकरा मारुती या समर्थ संस्थापित विविध देवतांच्या परिचयाच्या निमित्ताने समर्थांच्या ध्येयवादाचा स्फूर्तिदायक आलेख.)

४७. **मुसलमान मराठी संतकवी**
ज्ञानराज प्रकाशन, पुणे, १९६७.
(मराठी भक्तिधारेत भिजलेल्या अनेक अल्पज्ञात व अज्ञात अशा मुसलमान संतकवींच्या चरित्रांची, साधनेची

व कवितेची शोधपूर्वक ओळख)

४८. **विविधा**
नीलकंठ प्रकाशन, पुणे, १९६७,
(देव-देवता, साधुसंत, प्राचीन मराठी साहित्य आणि संस्कृती या विषयांवरील वीस महत्त्वपूर्ण लेखांचा वृहत्संग्रह.)

४९. **निरंजन माधवविरचित सुभद्रास्वयंवर** (संपादन)
नीलकंठ प्रकाशन, पुणे, १९६७.
('निरंजन-माधव : व्यक्ती आणि वाङ्मय' नामक प्रदीर्घ प्रस्तावनेत कवीच्या चरित्रावर, वाङ्मयावर आणि संपादनविषय असलेल्या काव्यावर विपुल नवा प्रकाश)

५०. **संतांच्या आत्मकथा** (संपादन)
पुष्पक प्रकाशन, पुणे, १९६७.
(महापतींच्या संतचरित्रपर निवडक चरित्रकथांचे संपादन. प्रारंभी प्राचीन मराठीतील चरित्रपर वाङ्मयाचा विस्तृत विवेचक परामर्श)

५२. **मानपुरी-पदावली** (संपादन : प्रा. अशोक कामत यांच्या सहयोगाने)
पुष्पक प्रकाशन, पुणे, १९६७.
(महाराष्ट्र निवासी हिंदी संतकवी मानपुरी याच्या चरित्राचा, परंपरेचा आणि कवितेचा शोध)

५३. **साहित्यप्रभा** (संपादन : सहयोगाने)
शारदा प्रकाशन
(मराठवाडा विभागातील शाळांसाठी मंजूर झालेली आठवी-नववी-दहावीची मराठी विषयाची पाठ्यपुस्तकमाला)

५४. **पदवीपूर्व मराठी दीपिका** (पुणे विद्यापीठ)
जोशी ब्रदर्स बुकसेलर्स अँड पब्लिशर्स, पुणे, १९६९.

५५. **ईश्वरनिष्ठांची मांदियाळी** (संपादन)
रामकृष्ण आश्रम, पुणे, १९७०.
(अनेक लेखकांच्या संतविषयक लेखांचा संग्रह)

५६. **संस्कृति सुगंध** (संपादन : सहयोगाने)
द्वितीयावृत्ती : दास्ताने रामचंद्र आणि कंपनी, पुणे १९७७.
(श्री. वि. त्र्यं. शेटे यांच्या गौरवानिमित्त अनेक अभ्यासकांनी लिहिलेल्या संस्कृतीविषयक विवेचक लेखांचा संग्रह)

५७. **श्रीनामदेव : एक विजयात्रा** (प्रा. अशोक कामत यांच्या सहयोगाने)
विश्वकर्मा साहित्यालय, पुणे, १९७१.
(संत नामदेवांच्या जीवनकार्याचा ललित वेध)

५८. **लोकसंस्कृतीची क्षितिजे**
विश्वकर्मा साहित्यालय, पुणे, १९७१.
(लोकसंस्कृतिविषयक आठ शोधनिबंधांचा संग्रह)

५९. **वारसा** (संपादन)
विश्वकर्मा साहित्यालय, पुणे, १९७१.
(सारस्वतकार वि. ल. भावे यांच्या असंकलित लेखांचा संग्रह. भाव्यांच्या चरित्राचा आणि वाङ्मयकार्याचा परामर्श घेणारी विस्तृत प्रस्तावना)

६०. **गंगाजळी**
नीलकंठ प्रकाशन, पुणे, १९७२.
(प्राचीन मराठी वाङ्मयविषयक शोधनिबंध व टिपणे)

६१. **श्रीआदिनाथ भैरव विरचित नाथलीलामृत** (संपादन)
के. भि. ढवळे प्रकाशन, मुंबई. १९७२.
(नाथपरंपरेतील उपेक्षित ग्रंथाची सुसंपादित आवृत्ती)

६२. **श्रीगोपाळनाथ गाथा** (संपादन)
वि. भा. घोलप, त्रिपुटी (जि. सातारा).

६३. **प्राचीन मराठीच्या नवधारा** (संपादन)
मोघे प्रकाशन, कोल्हापूर, पुणे, १९७२.
(जैन, गाणपत्य, वीरशैव, नागेश या चार संप्रदायांच्या मराठी वाङ्मयाचा शोधपूर्वक परिचय)

६४. **श्रीचिंतामणिनाथविरचित ज्ञानकैवल्य**
(संपादन : श्री. मोरेश्वर वाळिंबे यांच्या सहयोगाने)
स्वामी स्वरूपानंद सेवा मंडळ, पावस (जि. रत्नागिरी). १९७३.

६५. **श्रीचक्रधरनिरुपित श्रीकृष्णचरित्र** (संपादन)
वि. भा. घोलप, त्रिपुटी (जि. सातारा), १९७३.

६७. **महिकावतीची बखर** (संपादन)
अनमोल प्रकाशन, पुणे, १९७३.

६८. **शक्तिपीठांचा शोध**
मोघे प्रकाशन, कोल्हापूर, पुणे, १९७३.
(पुढे 'लज्जागौरी'त समाविष्ट झालेली पुस्तिका)

६९. **दोन दत्तजन्माख्याने** (संपादन)
धार्मिक प्रकाशन, पुणे, १९७३.
(श्रीउत्तमश्लोकविरचित 'श्रीदत्तजननोत्साहवर्णन' आणि श्रीमहिपतिमहाराजविरचित 'श्रीदत्तजन्म')

७०. **सार्थ सविवरण श्रीगणेशाथर्वशीर्ष** (संपादन)
स्वतः, पुणे, १९७४.

७१. **ही चिरंतनाची वाट**
इंद्रासणी साहित्य, पुणे, १९७५.
(संतविषयक ललित लेख)

७२. **विराग आणि अनुराग**
इंद्रायणी साहित्य, पुणे. १९७५.
(साहित्य-संस्कृतिविषयक ललित लेख)



अनुक्रमणिका

७३. **श्रीधरस्वामी नाझरेकरविरचित मल्लारि-माहात्म्य** (संपादन)
वरदा बुक्स, पुणे. १९७५.

७४. **गोपाळबुवा केळकर लिखित 'श्रीस्वामी समर्थ** (संपादन)
अनमोल प्रकाशन, पुणे. १९७५.
(अक्कलकोटस्वामींच्या चरित्राची बखर)

७५. **श्रीज्ञानेश्वर विविध दर्शन** (संपादन : श्री. वि. त्र्यं. शेटे यांच्या सहयोगाने)
इंद्रायणी साहित्य, पुणे, १८७५.
(श्रीज्ञानदेवांविषयी अनेक अभ्यासकांनी लिहिलेल्या लेखांचा संग्रह)

७६. **श्रीशिवदिग्विजय** (संपादन)
अनमोल प्रकाशन, पुणे. १८७५.
(शिवचरित्राची बखर)

७७. **श्रीगंगाधरकवी विरचित मार्तंडविजय** (संपादन)
वरदा बुक्स, पुणे, १९७५.
(खंडोबाच्या कथा-गाथा आणि उपासनाविधी यांचे विस्तृत विवेचन करणारा ओवीबद्ध ग्रंथ)

७८. **लौकिक आणि अलौकिक**
इंद्रायणी साहित्य, पुणे, १९७६.
(सांस्कृतिक विषयांवरील ललित लेख)

७९. **कल्पवेल**
इंद्रायणी साहित्य, पुणे, १९७६.
(श्रीकृष्णदयार्णवांच्या जीवनाचा आणि काव्याचा रसाळ आलेख. 'हरिवरदा' खंड ४ ते ८ च्या प्रस्तावना परिष्कृत स्वरूपात समाविष्ट)

८०. **मातंगीपट्ट**
अ. भा. महानुभव परिषद, औरंगाबाद, १९७६.
('लज्जागौरी'त समाविष्ट झालेली पुस्तिका)

८१. **चक्रपाणि**
विश्वकर्मा साहित्यालय, पुणे, १९७७.
(यादवकालीन मराठी वाङ्मयाची सांस्कृतिक पार्श्वभूमी. पीएच. डी. प्रबंध)

८२. **मुरारिमल्लविरचित बाळक्रीडा**
(संपादन : श्री. मोरेश्वर वाळिंबे यांच्या सहयोगाने)
श्रीविद्या प्रकाशन, पुणे. १८७७.

८३. **शोधशिल्प**
विश्वकर्मा साहित्यालय, पुणे, १९७७.
(श्रीज्ञानदेव व मुकुंदराज आणि त्यांच्या परंपरा या विषयांवरील शोधनिबंध)

८४. **मानसयात्रा**
इंद्रायणी साहित्य, पुणे, १९७७.
(सांस्कृतिक विषयांवरील ललित लेख)

८५. **श्रीज्ञानेश्वर-नवदर्शन** (संपादन : सहयोगाने)
महाराष्ट्र शासन, मुंबई, १९७७.
(श्रीज्ञानदेवविषयक अनेक अभ्यासकांचे लेख)

८६. **महाराष्ट्राचा देव्हारा**
विश्वकर्मा साहित्यालय, पुणे, १९७८.
(संतांच्या दृष्टीतून महाराष्ट्रातील दैवतमंडलाचे शोधपूर्ण दर्शनः पुणे विद्यापीठाची केळकर व्याख्यानमाला, १९७६)

८७. **लज्जागौरी**
श्रीविद्या प्रकाशन, पुणे, १९७८.
(मातृदेवतेच्या उपासना परंपरेवर नवा प्रकाश टाकणारा ग्रंथ)

८८. **संतसाहित्य आणि लोकसाहित्य : काही अनुबंध**
श्रीविद्या प्रकाशन, पुणे, १८७८.
(संतसाहित्यसमीक्षेची लोकतत्त्वीय दृष्टी स्पष्ट करणारा ग्रंथ)

८९. **पुण्याई**
इंद्रायणी साहित्य, पुणे. १९७९.
(नवमहाराष्ट्राचे काही प्रबोधक आणि एक प्रबोधनकेंद्र यांविषयीचे स्फुट लेख)

९०. **राष्ट्रचिंतन** (पं. दीनदयाळ उपाध्याय)
(अनुवाद : डॉ. विनायक पोंक्षे यांच्या सहयोगाने)
भारतीय विचारसाधना, पुणे, १९७०-८०.

९१. **श्रीविठ्ठल : एक महासमन्वय**
श्रीविद्या प्रकाशन, पुणे, १९८४.
(दक्षिणेतील गोपजनांच्या एका लोकप्रिय देवाच्या वैष्णवीकरणाची आणि उन्नयनाची शोधकथा)

९२. **बोरकरांची प्रेमकविता** (संपादन)
सुरेश एजन्सी, पुणे, १९८७.
(कविवर्य बा. भ. बोरकर यांच्या प्रेमकवितांचे संपादन)

९३. **महामाया** (डॉ. तारा भवाळकर यांच्या सहयोगाने)
अजिंक्य प्रकाशन, पुणे, १९८८.
(दक्षिणेतील मध्यकालीन काव्यनाटकांतून कैकाडी स्त्रीच्या रूपात प्रकटलेल्या महामायेचे रहस्य उलगडण्याच्या निमित्ताने समाज, धर्म आणि कला यांच्या परस्पर संबंधाचा शोध)

९४. **कल्पद्रुमाचिये तळी**
उत्कर्ष प्रकाशन, पुणे, १९९०.
(श्रीज्ञानदेव आणि ज्ञानदेवी यांविषयीचे स्वतःच्या पूर्वप्रकाशित पुस्तकातील लेख काही असंकलित लेख-

टिपणांसह)'

९५. **लोकसाहित्य : शोध आणि समीक्षा**
श्रीविद्या प्रकाशन, पुणे, १९९०.
(संस्कृतीच्या शोधात लोकपरंपरेच्या अभ्यासाचे असाधारण महत्त्व स्पष्ट करणारे विवेचक लेख)

९६. **चरित्रप्रभा**
मंजुल प्रकाशन, पुणे, १९९०.
(प्राचीन मराठी वाङ्मयातील चरित्र-आत्मचरित्रांची वेधक मीमांसा. 'संतांच्या आत्मकथा' व 'संतांच्या चरित्रकथा' या संपादित पुस्तकांतील प्रदीर्घ प्रस्तावनांचे परिष्कृत-परिवर्धित रूप)

९७. **प्राचीन मराठी वाङ्मय : शोध आणि संहिता**
अंजली प्रकाशन, पुणे, १९९१.
(प्राचीन मराठी वाङ्मयावर प्रकाश टाकणारे काही शोधलेख, काही विवेचक प्रस्तावना आणि प्राचीन मराठी वाङ्मयाविषयीची भूमिका स्पष्ट करणारा प्रदीर्घ निबंध-काही नवोपलब्ध कृतींच्या संहितांसह)

९८. **कथापंचक**
मंजुल प्रकाशन, पुणे, १९९१.
(लोकवाङ्मय व पुराणवाङ्मय यांतील पुनःकथित पाच बोधकथा)

९९. **ज्ञानदेव आणि ज्ञानदेवी** (संपादन)
श्रीविद्या प्रकाशन, पुणे, १९९१.
(ज्ञानदेव आणि ज्ञानदेवी यांच्याविषयी जुने-नवे समाजप्रबोधक, चिंतक, अभ्यासक, समीक्षक आणि कलावंत यांनी मांडलेल्या विचारांचा संग्रह)

१००. **विसोबा खेचर विरचित षट्स्थल**
'गुरुमाऊली', दिवाळी वार्षिक, १९८९.
इंद्रायणी साहित्य, पुणे.
पुस्तकरूपात- अबोली किशन, सोलापूर २०००.
('चक्रपाणि' या ग्रंथाचा विवेचन विषय असलेल्या, ज्ञानदेवकालीन अपूर्व ग्रंथाचा शोध व साक्षेपी संपादन)

१०१. **शिखर शिंगणापूरचा श्रीशंभूमहादेव**
श्रीविद्या प्रकाशन, पुणे, २००१.

१०२. **श्रीतुळजाभवानी**
पद्मगंधा प्रकाशन, पुणे, २००७.
द्वितीयावृत्ती- २००८, पुनर्मुद्रण - २००९, २०१२, २०१५.

१०३. **करवीरनिवासिनी श्रीमहालक्ष्मी**
पद्मगंधा प्रकाशन, पुणे, २००९.
पुनर्मुद्रण- २०१०, २०१४.

१०४. **श्रीवेंकटेश्वर आणि श्रीकालहस्तीश्वर**
पद्मगंधा प्रकाशन, पुणे, २०११.
पुनर्मुद्रण - २०१५.

१०५. **श्रीपर्वताच्या छायेत**
पद्मगंधा प्रकाशन, पुणे, २०१५.

१०६. **त्रिविधा** (प्राचीन मराठीच्या तीन साहित्यधारा)
पद्मगंधा प्रकाशन, पुणे. २०१५.

१०७. **श्रीनामदेव : जनी आणि नागरी**
पद्मगंधा प्रकाशन, पुणे, २०१५.

- **सटीप दासबोध**
  श्रीधरकुटी, सज्जनगड, १९५८.
  (टीप-लेखन. पुस्तकावर नाव छापलेले नाही.)
- **कैवल्याचे झाड**
  सुरेश एजन्सी, पुणे, १९८७.
  (कविवर बा. भ. बोरकर यांच्या भक्तिकवितांचे संपादन : पुस्तकावर संकलन म्हणून नाव छापलेले नाही.)
- **पुस्तकांची पुनर्मुद्रणे**
  (पुनर्व्यवस्था आणि नवी भर यांसह)

१. **लज्जागौरी**
(श्रीविद्या प्रकाशन, पुणे, १९८४.)
पद्मगंधा प्रकाशन, पुणे, द्वितीयावृत्ती- २०११, पुनर्मुद्रण-२०१५.

२. **श्रीचक्रधर निरूपित श्रीकृष्णचरित्र**
सुरेश एजन्सी, पुणे, १९८८.

३. **भक्तिवेडी बहिणा**
'साहित्यशिवार' दिवाळी अंक, १९८८.

४. **हरिवरदा** (त्रिखंडात्मक आवृत्ती)
इंद्रायणी साहित्य, पुणे, १९८९.
('कल्पवेल' हे कृष्णदयार्णवविषयक संपूर्णपुस्तक, प्रस्तावना-स्वरूपात समाविष्ट)

५. **नामयाची जनी** (नवे शीर्षक : धरिला पंढरीचा चोर)
'स्वामीमहाराज' दिवाळी अंक, १९८८.

६. **नाथ संप्रदायाचा इतिहास**
('गुरुमाऊली', दिवाळी वार्षिक, १९८९.)
पद्मगंधा प्रकाशन, पुणे, २००१, २००७, २०१०, २०१४.

७. **रामराज्याची स्फूर्तिकेंद्रे**
'स्वामीमहाराज', दिवाळी अंक, १९८९.

८. **मुसलमान मराठी संतकवी** (नवे शीर्षक : एकात्मतेचे शिल्पकार)
(मंजुल प्रकाशन, पुणे, १९९४.)
पद्मगंधा प्रकाशन, पुणे, १९९४, २००८, २०१४.

९. **लोकसंस्कृतीचे उपासक**

पद्मगंधा प्रकाशन, पुणे, १९९६. पुनर्मुद्रण- २००२, २००७, २०१५.

१०. **लोकदैवतांचे विश्व**
पद्मगंधा प्रकाशन, पुणे, १९९६. पुनर्मुद्रण- २०००, २००७, २०१३.

११. **भारतीय रंगभूमीच्या शोधात**
पद्मगंधा प्रकाशन, पुणे.,१९९६. पुनर्मुद्रण- २०१४.

१२. **संत, लोक आणि अभिजन**
पद्मगंधा प्रकाशन, पुणे, १९९८. पुनर्मुद्रण- २००५, २०१३.

१३. **दत्त संप्रदायाचा इतिहास**
पद्मगंधा प्रकाशन, पुणे, १९९९. पुनर्मुद्रण- २००५, २००९, २०१४.

१४. **दक्षिणेचा लोकदेव श्रीखंडोबा**
पद्मगंधा प्रकाशन, पुणे, २००२. पुनर्मुद्रण- २००७, २०१२, २०१६.

१५. **श्रीआनंदनायकी**
पद्मगंधा प्रकाशन, पुणे, २००२. पुनर्मुद्रण- २०११.

१६. **श्रीविठ्ठल : एक महासमन्वय**
पद्मगंधा प्रकाशन, पुणे, २००५. पुनर्मुद्रण- २००९, २०१२.

१७. **आज्ञापत्र**
पद्मगंधा प्रकाशन, पुणे, २००५. पुनर्मुद्रण- २०११, २०१४.

१८. **लोकसाहित्य : शोध आणि समीक्षा**
पद्मगंधा प्रकाशन, पुणे, २००९. पुनर्मुद्रण- २०१४.

- **कविता / संगीतिका**

शालेय जीवनात आणि नंतरच्या काळातही कविता स्वान्तसुखाय रचल्या. शालेय जीवनकालातील काही कविता 'समर्थ' (पुणे) या मासिकात १९५० पूर्वी प्रकाशित झाल्या होत्या. पुढे 'ज्ञानेश्वर' त्रैमासिक (पहिली माला), 'सह्याद्रि', 'केसरी', 'माणूस', इत्यादींमध्ये काही कविता प्रकाशित झाल्या असल्या, तरी कविता प्रकाशनाच्या बाबतीत डॉ. ढेरे उदासीन राहिले. त्यांनी रचलेल्या संगीतिकांपैकी 'अभिशाप' ही ऊर्वशी-अर्जुनावरील संगीतिका मुंबई आकाशवाणी केंद्रावर कविवर्य मंगेश पाडगावकरांनी सादर केली, तर 'महाकवि बिल्हण', 'कांचनमृग' (श्रीकृष्ण पोंक्षे यांच्या सहयोगाने), 'यक्षप्रिया' या संगीतिका पुणे आकाशवाणी केंद्रावरून सादर झाल्या. या एकाही संगीतिकेचे हस्तलिखित आता उपलब्ध नाही. 'प्रेमयोगिनी मीरा' (श्रीकृष्ण पोंक्षे यांच्या सहयोगाने) आणि 'यक्षप्रिया' या दोनच संगीतिका उपलब्ध असून, त्यांपैकी पहिली 'उन्नति' (पुणे) या कालिकाच्या १९५८ च्या दिवाळी अंकात प्रकाशित झालेली आहे. त्यांच्या प्राचीन पारंपरिक सरणीच्या रचनांपैकी त्यांनी केलेला 'जीवन्मुक्तगीते'चा ओवीबद्ध अनुवाद 'दत्त संप्रदायाचा इतिहास' (पुणे, १९६४) या त्यांच्या ग्रंथात परिशिष्टरूपाने समाविष्ट आहे, तर त्यांनी रामकृष्णांच्या दोन आणि स्वामी विवेकानंद व श्रीशारदामाता यांच्या प्रत्येकी एक अशा ज्या चार आरत्या रचलेल्या आहेत, त्या श्रीरामकृष्ण आश्रम, पुणे, या संस्थेच्या नित्योपासनेत वापरल्या जात आहेत. शिवाय संस्थेच्या प्रार्थना पुस्तकात त्या समाविष्ट झालेल्या आहेत. श्रीरामकृष्णांचे ओवीबद्ध स्तोत्र 'संतकृपा' मासिकात प्रकाशित झाले आहे.

**असंकलित लेखन**

- **स्फुट लेखटिपणे**

१. **करुणरसातील हृद्यत्व**
सरस्वती मंदिर संस्था-पूना नाइट हायस्कूल (पुणे) रौप्यमहोत्सवी अंक, १९५१.

२. **'सारस्वता'च्या पुरवणीतील एक विसंगती**
'मौज' साप्ताहिक (मुंबई), १९५२.

◆

## भावपूर्ण श्रद्धांजली



श्री. चंद्रशेखर केळकर

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे ज्येष्ठ सेवक **श्री. चंद्रशेखर केळकर** यांचे दिनांक १२ ऑगस्ट २०१६ रोजी अल्पशा आजाराने वयाच्या ६२ व्या वर्षी निधन झाले. ते महाराष्ट्र साहित्य परिषदेत गेली १५ वर्ष सेवक म्हणून काम करत होते. महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या वतीने त्यांना भावपूर्ण श्रद्धांजली.

तसेच सौ. ज्योत्स्ना नांदगिरीकर यांच्या मातोश्री **प्रमिला मखी** आणि भारती निनगुरकर यांचे पती **प्रबोध निनगुरकर** यांचे दुःखद निधन झाले त्यांनाही भावपूर्ण श्रद्धांजली.









लेख

रामचंद्र चिंतामण ढेरे

# माझ्या प्रेरणा



**माझ्या लेखनामागच्या प्रेरणा या शिक्षकांच्या प्रेरणांपेक्षा पूर्णपणे वेगळ्या आहेत. मी ललितेतर क्षेत्रातले लेखन करीत असूनही वेगळ्या आहेत. या वेगळेपणाची कारणे जशी माझ्या संस्कारांत आहेत तशीच ती सुदैवाने मला लाभलेल्या ईश्वरदत्त शक्तीतही आहेत. अस्सल साहित्यकाराला ज्याप्रमाणे तरल संवेदनशीलतेचे आणि मानवी जीवनाविषयीच्या नितांत आस्थेचे देणे लाभलेले असते, तसेच ते माझ्या परमभाग्याने मलाही लाभलेले आहे. माझा पिंडधर्म कवीचा आहे, ललित साहित्यकाराचा आहे; आणि त्याचमुळे महाराष्ट्राच्या सांस्कृतिक इतिहासाचे संशोधन मी कवीच्या स्वाभाविक जिव्हाळ्याने, प्रतिभावंताच्या पायाळू दृष्टीने करू शकलो आहे.**





कुणाही लेखकाच्या लेखनामागच्या प्रेरणा त्याच्यावर घडलेल्या संस्कारांतूनच उगवलेल्या असतात. तो घडला कसा, कोणती पूर्वसिद्धता घेऊन तो या जगात उतरला, आपल्या भोवतालच्या भौतिक अन् मानवी पर्यावरणाविषयी कोणत्या प्रतिक्रिया त्याच्या मनात उमटत-उसळत राहिल्या, या प्रश्नांच्या उत्तरांशी लेखनामागच्या प्रेरणांचा जवळचा संबंध आहे.

मी रूढार्थाने कवी नाही; कथा-कादंबरीकार तर नाहीच नाही. थोडेफार ललित गद्य माझ्या हातून लिहिले गेले आहे आणि माझ्या सर्वच संशोधनात्मक लेखनाला लालित्याचा रंग-गंध आहे. तरीही माझी प्रतिमा ललित साहित्यप्रकाराची नसून संशोधकाची आहे, अभ्यासकाची आहे. अन्य संशोधकांच्या लेखनापेक्षा माझ्या लेखनाला जाणकार रसिकांनी अधिक उत्कटतेने स्वीकारलेले असले, तरीही माझे स्थान ज्ञानोपासकांच्या मांदियाळीतच कुठल्या तरी कोपऱ्यात आहे याची मला नम्र जाणीव आहे.

लेखनामागच्या माझ्या प्रेरणा स्पष्ट करायच्या म्हणजे मी का लिहितो, या प्रश्नाचे उत्तर द्यायचे. खरे तर हे उत्तर मी यापूर्वी अनेक वेळा, अनेक निमित्तांनी दिलेले आहे. ललितेतर साहित्याच्या क्षेत्रात उदंड लेखन करणारे अनेक लेखक आहेत. त्यांत प्रामुख्याने अध्यापक-प्राध्यापकांचा मोठा वर्ग आहे. पूर्वसुरींचे



अनुक्रमणिका

ज्ञानसंचित अभ्यासक्रमानुसार सुगम-सुबोध करून सांगणे, किंवा सर्वसाधारण वाचकांच्या जिज्ञासेची तृप्ती करणे हा त्यांचा उद्देश असतो. शिक्षकाच्या व्यवसायाचीच ती अट असते. जे आत दाटले-साठले आहे ते अनावरणपणे अक्षरांत ओसंडते आहे, असा तो अनुभव नसतो. माहिती मिळवणे अन् विशिष्ट शिस्तीने ती मांडणे- असा तो तांत्रिक व्यवहार असतो. व्यापक समाजशिक्षणासाठी तो आवश्यक असतो, उपकर असतो. सुबुद्ध समाजाच्या घडणीत या व्यवहाराचे स्थान महत्त्वाचे असते, हे कोणीही नाकारणार नाही. 'शहाणे करून सोडावे सकळ जन' ही या प्रबोधक लेखनामागची प्रेरणा असते. समाजाची ती गरज असल्यामुळे अशा लेखनातून व्यवहारसाधनही सहज घडत राहते.

परंतु माझ्या लेखनामागच्या प्रेरणा या शिक्षकांच्या प्रेरणांपेक्षा पूर्णपणे वेगळ्या आहेत. मी ललितेतर क्षेत्रातले लेखन करीत असूनही वेगळ्या आहेत. या वेगळेपणाची कारणे जशी माझ्या संस्कारांत आहेत तशीच ती सुदैवाने मला लाभलेल्या ईश्वरदत्त शक्तीतही आहेत. अस्सल साहित्यकाराला ज्याप्रमाणे तरल संवेदनशीलतेचे आणि मानवी जीवनाविषयीच्या नितांत आस्थेचे देणे लाभलेले असते, तसेच ते माझ्या परमभाग्याने मलाही लाभलेले आहे. माझा पिंडधर्म कवीचा आहे, ललित साहित्यकाराचा आहे; आणि त्याचमुळे महाराष्ट्राच्या सांस्कृतिक इतिहासाचे संशोधन मी कवीच्या स्वाभाविक जिव्हाळ्याने, प्रतिभावंताच्या पायाळू दृष्टीने करू शकलो आहे. मी आजवर जी लहान-मोठी नव्वदच्या वर पुस्तके लिहिली वा संपादित केली, त्यांमागच्या प्रासंगिक प्रेरणा वेगवेगळ्या असल्या तरी त्यांना खऱ्या अर्थाने प्रेरणा म्हणता येणार नाही. ती त्या त्या वेळची निमित्ते होती. जे अनुभवले आहे, अभ्यासले आहे, निरखले-पारखले आहे, त्यातून घडलेला आपल्या परंपरेचा बोध जेव्हा जेव्हा अनावर होत असे, त्याच्या दाटणीचे ताण जेव्हा असह्य होत असत, तेव्हा एखाद्या प्रासंगिक निमित्ताने चमत्कार झाल्याप्रमाणे लेख अथवा पुस्तक अत्यंत वेगाने लिहून होत असे. अजूनही तसेच घडते.

संतसाहित्य आणि लोकसाहित्य हे माझ्या व्यासंगाचे मुख्य विषय. संतांची चरित्रे, त्यांनी ज्या संप्रदायांची दीक्षा घेतली ते संप्रदाय, त्यांचा श्रद्धाविषय बनलेली दैवते, त्यांनी आपापल्या संप्रदायाच्या प्रभावातून आणि आपल्या साधनेत आलेल्या अनुभवांतून निर्माण केलेले उदंड साहित्य हा जसा माझ्या अभ्यासाचा विषय आहे, तसाच लोकसाहित्याचा विराट प्रांतही माझ्या उत्कट जिज्ञासेचा विषय आहे. वरवर विचार करता हे दोन वेगळे अभ्यासविषय आहेत असे आपल्याला वाटले, तरी माझ्या लेखी हे दोन विषय एकात्म आहेत, एकरस आहेत. संत हे लोककल्याणाचा, लोकोद्धाराचा वसा घेतलेले असल्यामुळे, त्यांनी लोकपरंपरेचे हार्द जिव्हाळ्याने जाणून घेतले होते, लोकसंस्कृतीची सर्व सामर्थ्ये त्यांनी आत्मसात केली होती, लोकांशी व्यापक संवाद साधण्यासाठी सर्व लोकमाध्यमांचा त्यांनी पूर्ण ताकदीने अवलंब केला होता.

संतांनी त्यांच्या जीवितकार्याचे साधन म्हणून लोकसाहित्याचे अध्यात्मीकरण केले आहे. म्हणजेच संतसाहित्य हे अध्यात्मीकृत लोकसाहित्यच आहे. या अनुभवाच्या बैठकीवरूनच माझे बहुतेक सारे लेखन घडलेले आहे. संतसाहित्य आणि लोकसाहित्य यांच्याविषयी मला जी अपार आस्था आहे तिची बीजे माझ्यावर बालवयात घडलेल्या संस्कारांत आहेत, तसेच त्यांच्यातील अनुबंधाच्या जाणिवेची बीजेही त्याच संस्कारांत आहेत. इसवी सन १९४४ च्या पहिल्या दिवशी, अवघ्या तेरा वर्षांच्या वयात मी मावळातील आजोळचे खेडे सोडून पुण्यात आलो. नागर वातावरणात प्रविष्ट झालो, नागर विषयांशी परिचित झालो, नागर अध्ययनदृष्टीचा अवलंब करू लागलो; परंतु माझे जिव्हाळ्याचे विषय मात्र त्या आजोळच्या खेड्यातलेच राहिले. पुण्यात आल्यावर नव्या विद्यांच्या प्रकाशात मला जाणवले, की मी जिथे वाढलो ते खेडे परंपराशील महाराष्ट्राचे एक परिपूर्ण लघुरूप आहे. १९३५ च्या एप्रिलच्या मध्यात, आई-वडिलांच्या मृत्यूनंतर मी वयाच्या अवघ्या पाचव्या वर्षी आजोळी राहायला गेलो, तेव्हापासून १९४३ च्या अखेरीपर्यंत जेमतेम आठ-नऊ वर्षांचा काळ मी आजोळच्या खेड्यात काढला; परंतु त्या अल्पकाळात माझ्या कोवळ्या मनावर त्या वातावरणाचे जे अमिट संस्कार घडले त्या संस्कारांच्या अभ्यासात मी रमत राहिलो; त्या संस्कारांचे मर्म शोधीत राहिलो, नव्या जीवनदृष्टीशी त्या संस्कारांचे काही नातेगोते जुळते आहे का याचा शोध घेत राहिलो. त्या कालखंडातल्या संस्कारांपासून मी मनाने दूर जाऊ शकलो नाही. तेच संस्कार मला पुन्हा पुन्हा हात उंचावून पालवीत राहतात आणि मी पुन्हा पुन्हा त्यांच्या सहवासात राहून त्यांचे अंतरंग शोधण्यात रंगून जातो.

मला पोथ्या-पुराणांचा आणि कथा-गीतांचा एकसाथ परिचय आजोळच्या घरात झाला, गावात झाला. संतांच्या ग्रंथांच्या किती तरी पोथ्या आणि लोकांच्या कंठांतल्या किती तरी कथा-गाथा मला तिथे एकत्र पाहायला-ऐकायला मिळाल्या. माझ्या आजीची स्मृती या उभय संस्कारांचे भांडार बनलेली होती. तिने ते भांडार नातवंडांसाठी सदैव खुले ठेवले होते. त्या वेळी माझा जीव चिमुकला होता, माझे मन चिमुकले होते. त्या वयात, त्या परिस्थितीत, त्या वेदनामय मनःस्थितीत जेवढे घेता आले तेवढे घेतले. त्या स्पष्ट-अस्पष्ट संस्कारांचीच प्रतिबिंबे नव्या विद्यांच्या प्रकाशात उसळून वर येत राहिली आणि अनावर ऊर्मीने अक्षररूप पावत राहिली. प्रेरणा होती आतल्या अनावर साठवणीला वाट मोकळी करून

देण्याची आणि फळ होते अनिर्वचनीय आनंदाने रसरसलेले!

मला आजही स्पष्ट आठवते आहे. पावसाळ्यात आजोळच्या चंद्रमौळी घराचे छप्पर शतधारी गळायचे आणि दुःख-दारिद्र्याने गांजलेल्या आजीचे डोळे सहस्रधारांनी गळायचे. व्यथांच्या अग्निहोत्रात आजीचे उभे आयुष्य आत-बाहेर कोळपून गेले होते. व्यथा तिच्या स्वतःच्या आणि तिने ज्यांच्यावर जिवाभावाने प्रेम केले त्या माणसांच्या. परंतु असे असूनही तिचे जीवनचक्र फिरतच होते- ऋतुचक्राच्या सर्व आऱ्यांवर जागती दृष्टी ठेवून फिरत होते. परंपरेने तिच्या तनामनावर जे जे उमटवले होते ते ते सारे तिच्या नित्यक्रमातून सहज उमलून यायचे. अगदी अभावितपणे, दीर्घकाळच्या सवयीने तिचा हा नित्यक्रम साऱ्या गावाच्या जीवनक्रमाशी बांधलेला होता आणि गावाचा जीवनक्रम निसर्गक्रमाशी बांधलेला होता.

आषाढ सरला की छप्पर गळायचे थांबायचे. माहेरवाशिणींचा लाडका श्रावण कसा समृद्ध असायचा! या समृद्ध श्रावणात मी जे पाहिले, जे ऐकले आणि जे अनुभवले, ते आजही श्रावणातल्या वृक्ष-वेलींसारखेच माझ्या मनात लसलसते आहे. याच काळातल्या श्रावणात आजीच्या मुखातून मी कहाण्या ऐकल्या. 'ऐका परमेश्वर गणेशा, तुझी कहाणी. निर्मळ मळे, उदकाचे तळे. बेलाचा वृक्ष, सुवर्णाची कमळे. विनायकाची देवळे-रावळे. मनाचा गणेश मनी वसावा. हा वसा कधी घ्यावा. श्रावण्या चौथी घ्यावा...' अशा ताला-छंदात प्रकटणाऱ्या त्या कहाण्या ऐकताना मन मोहून जायचे. पाऊस रिमझिमतो आहे, झाडे डोलताहेत आणि झाडांच्या ओल्या फांद्यफांद्यांवर पाखरे झुलताहेत. अशा वेळी कहाण्यांचे हे तालबद्ध कथन चालू झाले की माझ्या मनात एक गारुडी जागा व्हायचा. उजव्या पायात घुंगूर बांधून पाय आपटीत ताल धरणारा आणि मुखाने रंगीत गोंड्याची पुंगी घुमवणारा. मग कहाणी संपली तरी मनाच्या नागाचे डोलणे काही थांबायचे नाही. सरलेल्या कहाणीचा ताल किती तरी वेळ मनात रेंगाळतच राहायचा. माझे मन या कहाण्यांच्या केवळ तालानेच नव्हे, तर त्यांच्या विषयांच्या गूढतेनेही प्रथमपासूनच भारलेले आहे. गेली कित्येक वर्षे मी अनावर ओढीने एकेका कहाणीची अंतःकहाणी उलगडण्याचा प्रयत्न करतो आहे; परंतु तो शोध अजूनही अपुराच राहिला आहे. या अशा अपुरेपणाच्या खंतीतूनच माझ्या शोधाच्या ऊर्मी चैतन्याने रसरसलेल्या आहेत आणि शोध-साक्षात्काराच्या विलक्षण आनंदाचे क्षण मला लिहिण्याची प्रेरणा देत राहिले आहेत. या क्षणांची धुंदी जगण्यात साऱ्या व्यथा-वेदनांचा विसर पाडते. शोधसाक्षात्कार अनुभवताना आणि तो अक्षरांत व्यावहारिक लाभ-हानीचा हिशोब निमिषभरही मनाला स्पर्श करीत नाही. असतो तो निखळ आनंदच आनंद!

◆









लेख

वा. ल. मंजूळ

# डॉ. रा. चिं. ढेरे यांना अनावृत्त पत्र



'लोककल्याण'मध्ये मी एकदा सेतुमाधवरावांना घेऊन आलो होतो. बालाजी आणि विठ्ठल यांच्यातील साम्याबद्दल तुम्ही बोलत होता. खूप दोन-तीन तास चर्चा झाली होती. भांडारकर संस्थेमध्ये काही काळ तुम्ही नियामक मंडळाचे (R.C) सदस्य होता. ग्रंथालय आणि हस्तलिखित संग्रहालय याबद्दल तुम्ही भरीव सूचना केल्या. संस्कृतचा तुमचा संबंध नव्हता, तरी संस्थेच्या सदस्यांना तुम्ही परके वाटला नाहीत. डॉ. दांडेकर, डॉ. यार्दी, लक्ष्मणशास्त्री जोशी आदी संशोधक तुमचा आदर राखत.





प्रिय अण्णा,

(पत्ता माहीत नाही कुठे आहात तुम्ही ते)

सा.न.वि.वि. म्हणू की स.न., की काहीच लिहू नको? शिष्टाचाराचा राग येईल तुम्हाला आणि फॉर्म्यालिटीही तुम्हाला आवडणार नाही.

२१ जुलै २०१६ ला वयाची ८६ पूर्ण होणार. गेली तीन-चार वर्षे तुम्ही आजारी, उठण्या-बोलण्याचा त्रास, तेव्हा अभिनंदनाला येण्याचा नित्यनेम कसा पुरा करायचा विचार करीत होतो. पण तुमच्या नावाने संशोधन ग्रंथालय सुरू करायचे आमंत्रण मिळाले. बेत पक्का केला. परंतु आमचे दुर्दैव असे की तुम्ही आधीच आमच्यातून निघून गेलात (हा हन्त हन्त नलिनी गज मुज्जहार!). अखेरचे दर्शन घ्यायला आलो; पण आठवर्णीनी मन दाटून आले आणि मधूनच घरी परतलो. आपली पन्नास वर्षांची निर्मळ-निरपेक्ष मैत्री संपल्याचे खूप वाईट वाटले.

मी चाळीस वर्षे भांडारकरमध्ये ग्रंथपाल होतो. तुम्ही दर शनिवारी सकाळी तिथे येत असत. वैचारिक देवाण-घेवाण अनेकांशी होत असे. ९॥ ला आपण आवर्जून चहा घेत असू. मोठा ग्रुप तयार झाला होता. त्या वेळी मी संस्थेच्या क्वार्टर्समध्ये राहात होतो. काही मंडळी तुम्ही माझ्याकडे आहे म्हटल्यावर ग्रंथालयामध्ये येण्याचे टाळत असत; पण ते तुम्ही मनाला लावून

घेतले नाही. ग्रंथालयात अनेक पुस्तके चाळून उपयुक्त, इश्यू करून घरी नेत होता. तसे तुम्हाला स्वतःचेच ग्रंथालय आवडायचे. एका व्यक्तीकडे चाळीस हजार ग्रंथ आणि दोन हजार हस्तलिखिते, शिवाय नियतकालिके वेगळीच. हे मी कधीच कोणत्याच ग्रंथप्रेमी अभ्यासकाकडे पाहिले नव्हते. शनिवार पेठेतल्या 'लोककल्याण'मध्ये तर घरात संसारोपयोगी वस्तूंपेक्षा ग्रंथच अधिक दिसायचे. पुढे सहकारनगरच्या 'विदिशा'मध्ये हा संग्रह तिसऱ्या मजल्यावर ठेवला होता. तेव्हा मी चेष्टेने म्हणालो, "अण्णा, पुस्तके तिसऱ्या मजल्यावर, तुम्ही दुसऱ्या मजल्यावर... पुस्तकाच्या भाराने मजला खाली आला तर?" तेव्हा ते म्हणाले, "म्हणजे मी पुस्तकांच्या भाराखालीच असेन!" मला वाईट वाटले. पुढे सुमारे वीस हजार पुस्तके अमेरिकेतर्फे डेक्कन कॉलेजमध्ये स्थापन झालेल्या 'मराठी कल्चरल सेंटर'ला तुम्ही देऊन टाकली आणि हस्तलिखित ठाण्याच्या प्राच्यविद्या संस्था आणि पुण्याच्या 'हस्तलिखित सेंटर'ला दिली. तुमच्या नावे ती सांभाळली गेली आहेत.

अण्णा, तुमच्या स्वभावाचे अनेक पैलू मनात घर करून आहेत. लोककल्याण मध्ये राहत असताना तुमच्या फ्लॅटवर तुमच्या नावाची पाटी नव्हती. मी नेहमीच आग्रह धरीत असे. आणि एकदा मीच तयार करून आणणार म्हटल्यावर तुम्ही त्यावर फक्त 'रामचंद्र चिंतामण ढेरे' एवढीच अक्षरे टाका. पदव्या, वगैरे काही नको, असे स्पष्ट बजावले. तुम्ही नेहमीच शर्ट-पायजमा आणि खांदापिशवी घेऊन सर्वत्र वावरायचात. आमच्या ग्रंथालयात एकदा एका विदेशी स्कॉलरने 'हे असे का' विचारल्यावर 'सिंपल लिव्हिंग अँन्ड हाय थिंकिंग'चे हे मूर्तिमंत उदाहरण आहे, असे मी बजावले त्याला.

तुम्ही सहकारनगरमध्ये राहावयाला जाऊनही सोमवारी जुनी पुस्तके पाहण्यासाठी सरस्वती हायस्कूल, लक्ष्मी रोड, अप्पा बळवंत चौक आणि डेक्कनवर कपिल पराडकरांच्याकडे येत होतात. तुमच्या पिशवीमध्ये कायम पुस्तके आढळून यायची. अण्णा, तीच तुमची परंपरा मी आजही चालवतो. पण पुस्तके ठेवायला मजकडे पुरेशी जागा नाही. त्या वेळी तुमच्या सोबत कायम मोरेश्वर वाळिंबे असायचे, जे कुलकर्णी बंगल्यात भांडारकर रोडवर राहायचे. त्यांनीही गॅरेजमध्येच मोठे ग्रंथालय उभे केले होते.

तुम्हाला २१ जुलै १९८० रोजी वयाची पन्नास वर्षे पूर्ण झाली, हे समजल्यावर आम्ही (प्रा. गो. म. कुलकर्णी, श्री. दादासाहेब शेटे, अशोक कामत, वाळिंबे, अरुणा ढेरे आणि मी) तुमच्या आवडत्या विषयावर 'महाराष्ट्राची सत्त्वधारा' असा गौरवग्रंथ काढून आमची आत्मीयता व्यक्त केली. महाराष्ट्राच्या लाडक्या दैवतावर, विठ्ठलावर त्या निमित्ताने विशेष ग्रंथ निघाला. समारंभ १८ ऑक्टोबर १९८० ला झाला. तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री प्रामुख्याने हजर होते. प्रा. रिसाईड, प्रा. सोन्थायमर, धुंडा महाराज, सारवदे महाराज, शोभना गोखले, भा. पं. बहिरट असे अनेक मान्यवर या ग्रंथाचे लेखक होते. असे भाग्य इतरांना क्वचित पण अण्णा तुम्हाला लाभले. आम्ही आनंदलो. त्या वेळी कळले, तुम्ही नव्वद ग्रंथ लिहिले, तसेच पाच ग्रंथांचे साहित्य पानशेतच्या पुरात वाहून गेले. आम्ही अगदी जवळचे असूनही तुमची प्रतिभा लक्षात आली नाही.

१९८४ च्या आधी तुम्ही श्रीविठ्ठलावर काम करण्याचे ठरवले. मी पंढरपूरकर असल्याने तुम्हाला मदत करण्यासाठी सदैव बरोबर राहावयाचे ठरविले. खूप महत्त्वाचा आणि लोकप्रिय संशोधनाचा विषय. खुद्द पंढरपुरात तीन-चार चकरा आपल्या झाल्या. मला जे माहीत ते सर्व तुम्हाला सांगत गेलो आणि पुढे तुम्ही मला 'पंढरपूरच्या अलक्षित कथा' नावाचे पुस्तक त्या माहितीतून प्रसिद्ध करायला लावले. माझ्या मित्राकडे, शहाणे सोनारकडे मालुतारण (धुंडीराज मालूकृत) नावाचा संदर्भग्रंथ हस्तलिखित स्वरूपात पूजेत ठेवला होता, तो आपण रात्रीपुरता मागून घेऊन त्याची झेरॉक्स रातोरात काढली. सकाळी पूजेसाठी तो ग्रंथ परत केला. स्कंद पुराणाच्या 'पांडुरंगमाहात्म्यात' श्रीविठ्ठलाच्या छातीवर मंत्र कोरला आहे अशी माहिती तुम्हाला मिळाली, आणि तशी मूर्ती कुर्डूवाडीजवळ 'माढे' येथे आहे कळल्याने आपण तिकडे गेलो. स्कंद / पुराणवर्णनातील जुनी मूर्ती ती हीच असावी तुमची खात्री. पण छातीवरच्या कूटमंत्राचे काय? आपण आचार्य वि. प्र. लिमये यांच्याकडे गेलो. त्यांनी अर्थ सांगितला आणि त्यावरून 'आद्यमूर्ती' माढ्याची असे तुम्ही ठरवले. त्यावर पंढरपूरकर चवताळले. स्कंदपुराणातल्या पांडुरंगमाहात्म्यातील मूर्तीचे सर्वच वर्णन त्या मूर्तीत दिसले. इतिहास संशोधक राजवाडे यांनी इ. स. १६५९ मध्ये अफजलखानाच्या स्वारीच्या वेळी मूर्ती माढ्याला नेली होती. आणि बाबा पाध्ये यांनी एका संस्कृत स्तोत्रात मूर्तीच्या वक्षःस्थलावर मंत्र आहे म्हटल्याने तुम्ही

ती आद्यमूर्ती असावी असे म्हटले. पण पंढरपूरकरांना तुमचा राग आला. आणि मग आपण दोघे पुन्हा विठ्ठलदर्शनाला पंढरपुरात गेलो. मला आठवते, मूर्तीसमोर उभे राहून तुम्ही अश्रू ढाळीत होता. हीच खरी भक्ती आणि श्रद्धा, तुम्ही संशोधक असूनही! नंतर माढेमूर्ती मूळच्या पंढरपुरातील मूर्तीची 'रिप्लिका' होय असे ठरले.

'लोककल्याण'मध्ये मी एकदा सेतुमाधवरावांना घेऊन आलो होतो. बालाजी आणि विठ्ठल यांच्यातील साम्याबद्दल तुम्ही बोलत होता. खूप दोन-तीन तास चर्चा झाली होती. भांडारकर संस्थेमध्ये काही काळ तुम्ही नियामक मंडळाचे (R.C) सदस्य होता. ग्रंथालय आणि हस्तलिखित संग्रहालय याबद्दल तुम्ही भरीव सूचना केल्या. संस्कृतचा तुमचा संबंध नव्हता, तरी संस्थेच्या सदस्यांना तुम्ही परके वाटला नाहीत. डॉ. दांडेकर, डॉ. यार्दी, लक्ष्मणशास्त्री जोशी आदी संशोधक तुमचा आदर राखत.

अलीकडची तीन वर्षे तुमच्या आजारपणात तुम्हाला भेटायला येणे संकट वाटे. तुम्हाला बोलायला जमत नसे, पण डोळे पाणावलेले असत. जुन्या आठवणीतून आम्ही कुटुंबातील इतरांशी संवाद साधत असू. तुमची अवस्था पाहवत नसे. लौकर बरे होऊन पुन्हा कामाला लागाल, असेच आम्ही म्हणत असू, जरी ते खरे नव्हते तरी! तरी पण अण्णा, तुम्ही एक दिवस अरुणासह 'उत्कर्ष'मध्ये डेक्कनवर आला होता. अण्णा इथे येऊन पुस्तके खरीदण्याची तुमची सवय होती. स्नेही पराडकर आणि सु.वा. जोशींना गतवर्षी भेटून गेलात.

अण्णा, तुम्ही ग्रंथपालाचा सर्टिफिकेट कोर्स केला होता. आणि १९५२ ते १९५५ नूमविचे ग्रंथपाल होतात, पण काही भांडारकर ग्रंथालयात यासंबंधात बोलला नाहीत त्याची रुखरुख वाटत असे. खरे तर तुम्ही 'मुद्रित शोधन'ही करीत होता. पण तुमचा मूळचा पिंड संशोधकाचा आणि तो अलीकडच्या दैवतविषयक शोधग्रंथाच्या निर्मितीतून लक्षात आला. श्रीविठ्ठल महासमन्वयासाठी पंढरपूरचा कोपरा न् कोपरा आपण शोधला. जुने संस्कृत ग्रंथ, शास्त्रीपंडितांच्या गाठीभेटी, पंचक्रोशीतील दैवते सगळे पाहिले. पण एकदा तुम्हाला वारीत वाखरी ते पंढरपूर पायी यायची इच्छा होती ती तशीच राहिली. तुम्हाला आठवत असेल, ऑक्टोबर १९८८ मध्ये आपण डॉ. ॲनफेल्डहाऊससह पंढरपूर-मंगळवेढे-माचणूर असा प्रवास केला. एका रात्री माळशिरसच्या सरकारी वसतिगृहात मुक्काम केला. तळमजल्यामधील खोलीत रात्री मोठा विंचू निघाला. रात्रभर तुम्हाला झोप नव्हती. पुण्याला परतताना डाव्या हाताला शिखर शिंगणापूरचा डोंगर दिसू लागल्यावर तुम्ही म्हणालात, "मला त्या शंभूमहादेवावर काम करायचे आहे काही तरी." आम्ही लगेच म्हणालो, "पुण्याला परतल्यावर लगेचच सुरु करा." पण साधनांची जमवाजमव करण्यात १२-१३ वर्षे गेली आणि २१ जुलै २००१ ला तुम्ही 'शिखर शिंगणापूरचा महादेव' वाचकांच्या हाती दिला. तसे तुमचा वाढदिवस म्हणजे एक नव्या संशोधनात्मक साहित्याची मेजवानीच असे. या वर्षीही तुम्ही अर्धवट तयार केलेले 'नरसिंहा'वरचे पुस्तक अरुणा २२ जुलै २०१६ ला प्रसिद्ध करणार होती; पण काळाने डाव साधला. अचानक तुम्ही आमच्यातून निघून गेलात.

अण्णा, तुमच्या गौरवाचा प्रत्येक समारंभ मी अनुभवला. तुम्हीदेखील प्रत्येक ग्रंथात माझ्या मदतीचा उल्लेख केला. साहित्य संमेलनाच्या (गरवारे कॉलेज मैदानावरच्या) स्मरणिकेत माझ्या नावे 'अर्पणपत्रिका' लिहून मला मोठेपणा दिलात. तुमच्याइतकेच आपलेपण 'ढेरे' कुटुंबीयांनी आम्हाला म्हणजे सर्व मंजूळ कुटुंबीयांना दिले. तुम्ही गेल्यावर सांत्वनाचे फोन मलाही आले.

तुमचे मृदू बोलणे, साधी वर्तणूक, वागण्यातील आत्मीयता, निर्मळ हास्य आता मी कोठे शोधायचे?

हो, आणखी एक आठवण राहिली. पुणे विद्यापीठाच्या संत नामदेव अध्यासनावर प्रमुख म्हणून तुमची नेमणूक व्हायची होती. तुम्ही अर्ज केला नव्हता तरी परीक्षक मंडळाने एकमताने तुमची निवड केली. पण पदाच्या अटी तुम्हाला मान्य नसल्याने तुम्ही ते पद स्वीकारले नाही. (अशी कोठलीच नोकरी तुम्ही स्वीकारली नाही.) मग तुमच्या जागी आपल्या एका मित्राची नेमणूक झाली. अधिकारपदाची सूत्रे स्वीकारण्यासाठी त्या मित्राने भांडारकरच्या क्वार्टर्समध्ये येऊन माझ्या पायावर डोके ठेवले, मला काहीच कळेना. नंतर त्याने सांगितले, "हा नमस्कार तुला नव्हता. डॉ. ढेरे यांचा जिवलग मित्र म्हणून तो तू पोहोचता करावा त्यांना, म्हणून हे सर्व केले. धन्य अण्णा तुमची, तुमच्या लोकप्रियतेची!

◆

**वा. ल. मंजूळ**
चलभाष : ९९२२७७९८८९









लेख

डॉ. रमेश जाधव

# लोकसंस्कृतीचा आधारवड कोसळला!



**गेल्या २५ वर्षांत ढेरेअण्णांसारख्या ज्येष्ठ संशोधकाशी माझा जो पत्रसंवाद होत राहिला तो माझ्यासाठी नेहमी आनंद तर देत होता, परंतु त्याहीपेक्षा एक सृजनशील आणि सत्‌शील माणूस आपल्या पाठीशी सतत निरपेक्ष भावनेने उभा आहे याचे अप्रूप फार मोठं होते. त्यांचे हे असणे माझ्यासाठी खूप काही देऊन जात होते. आपल्या परिवारातील एखाद्या लेखकाचे नवे पुस्तक प्रसिद्ध होत असताना त्यांना होणारा आनंद आणि ते पुस्तक स्वरूपात लवकर प्रसिद्ध व्हावे म्हणून त्यांच्याकडून केली जाणारी धडपड याचा अनुभव मी माझ्या 'लोकराजा शाहू छत्रपती' आणि 'शाहू छत्रपती आणि लोकमान्य' या दोन्ही ग्रंथांच्या वेळी घेतला आहे.**





१ जुलै २०१६. नेहमीप्रमाणे प्रभात फेरी झाली होती. मन प्रसन्न होते. चहापान चालू होते. अशा सुखावस्थेत असताना घरातील फोनची घंटी खणखणली. पुण्याहून रा. चिं. ढेरे, अण्णांच्या कन्या वर्षाताई बोलत होत्या.

"सर, अण्णा गेले!"

मी फार वेळ दवडला नाही. माझी गाडी पुण्याच्या दिशेने धावू लागली. मानव हा मर्त्य प्राणी आहे, हे वैश्विक सत्य आपण ज्यांच्यावर अपार जीव लावतो त्या व्यक्तींबाबत खोटे ठरावे असे वेड्यासारखे वाटत असते. तीर्थस्वरूप ढेरेअण्णांच्या बाबत तसेच वाटत होते. परंतु तसे कधी घडत नसते आणि कधी घडणारही नाही.

प्रज्ञा आणि प्रतिभा यांचा अलौकिक संगम ज्यांच्या ठिकाणी नियतीने घडवून आणला होता ते संतसाहित्य आणि लोकसाहित्याचे ज्येष्ठ संशोधक रामचंद्र चिंतामण ढेरे हे जग सोडून गेले होते, हे सत्य स्वीकारून भरल्या डोळ्यांनी आणि गेल्या २५ वर्षांतील ढेरेअण्णांसंबंधीच्या असंख्य आठवणी मनामध्ये घेऊन मी पुणे जवळ करीत होतो. नेहमीचाच कोल्हापूर-पुणे रस्ता संपला नव्हता.

अनेक अडथळ्यांची शर्यत पार करीत दुपारी १२च्या दरम्यान मी पुण्यातील टिळक रोडवर असणाऱ्या साहित्य परिषदेच्या सभागृहात पोहोचलो होतो. विविध क्षेत्रांतील मान्यवर आपल्यासाठी ताटकळत थांबले होते, हे पाहून मला अवघडल्यासारखे झाले. सभागृहाच्या मधोमध टेबलावर ढेरे अण्णांचा मृतदेह







पहुडला होता. असंख्य हारांनी त्यांचा मृतदेह झाकला गेला होता. चेहरा किंचित उघडा होता. मी लगबगीने पुढे होऊन ढेरेअण्णांना हार अर्पण करून त्यांच्या पायावर डोके ठेवून बाजूला झालो आणि आत्तापर्यंत आवरून धरलेल्या अश्रूंना वाट करून दिली. आम्हा रांगड्या कोल्हापूरकरांना पांढरपेशी पुणेरी शिष्टाचार जमत नाहीत. हे माझ्याबाबत त्यांनी अनेकदा अनुभवले होते. शववाहिकेत ढेरेअण्णांच्या सोबतीला इतर कुटुंबीयांप्रमाणे मीही होतो. इतकेच नव्हे, तर वैकुंठभूमीतील विद्युतवाहिनीत त्यांचा मृतदेह ठेवेपर्यंत मी त्याच्या सोबतीला होतो.

आयुष्यभर देव-देवतांचा आणि धर्मग्रंथांचा अभ्यास करणाऱ्या ढेरेअण्णांचा देह कोणत्याही प्रकारचे धार्मिक विधी न करता अनंतात विलीन झाला होता. हेच तर त्यांचे वेगळेपण होते. श्रद्धा आणि शास्त्र यांचा अपूर्व मिलाफ त्यांच्या व्यक्तिमत्त्वात झाला होता.

त्याच दिवशी संध्याकाळी मी पुणे सोडले. माझी गाडी कोल्हापूर जवळ करीत होती. ४-५ तासांच्या त्या प्रवासात गेल्या २५ वर्षांतील त्यांच्यासंबंधीच्या असंख्य आठवणी पिंगा घालू लागल्या. रात्री घरी आल्यावर त्यांनी मला लिहिलेली असंख्य पत्रे वाचू लागलो. प्रत्येकं पत्रात शब्दाशब्दांतून व्यक्त होणारा जिव्हाळा आणि आपलेपणा यामुळे एकीकडे भारावून जात होतो आणि दुसरीकडे हे आता सारं संपलं आहे, त्यांच्या जाण्याने आपण संशोधन क्षेत्रात पोरके झालो आहोत, आपला मायेचा आधारवड आता कोसळून पडला आहे ही भावना खूप त्रास देत होती.

त्याच वेळी मनामध्ये आणखी एक विचार आला तो असा, की ढेरेअण्णांचा मृत्यू आपणाला सामाजिक संशोधन क्षेत्रात पोरके करून गेला हे तर व्यक्तिगत दुःख आहेच; परंतु त्याहीपेक्षा मराठी लोकसंस्कृतीचा आधारवड कोसळल्यामुळे महाराष्ट्राची लोकसंस्कृती आता अनाथ झाली, पोरकी झाली हे दुःख अधिक मोठे आहे.

**अण्णांची पहिली भेट**

१७ जून रोजी एका पावसाळी सकाळी आदरणीय ढेरेअण्णांची पहिली भेट झाली. तीही माझ्या घरी. 'पुंडलिका भेटी आलेगा परब्रह्म' अशी त्या वेळी माझी अवस्था झाली. कोल्हापुरातील 'महाराष्ट्र ग्रंथ भांडार'चे मालक आणि माझे महाविद्यालयातील गुरुवर्य प्रा. शशिकांत कुलकर्णी यांच्यामुळे ही भेट झाली. ढेरेअण्णांचे 'विठ्ठल : एक महासमन्वय', 'लज्जागौरी' आणि 'महाराष्ट्राचा देव्हारा' यासारखे सर्वांगसुंदर असे संशोधनात्मक ग्रंथ वाचून मी त्यांच्या लेखनाचा मनःपूत चाहता बनलो होतो. त्यामुळे त्यांना भेटण्याची माझी तीव्र इच्छा होती. ती त्या दिवशी पूर्ण झाली होती. त्यानंतर ढेरे सर २१ जून १९९१ च्या पत्रात लिहितात, '१७ रोजी सकाळी तुमच्या घरी भेट झाली. एक निर्मळमनस्क तरुण ज्ञानोपासक आपल्या स्नेह परिवारात असल्याचं समाधान मला तुमच्या भेटीतून लाभलं. खूप बरं वाटलं... पहिल्याच भेटीत जागलेला स्नेह वाढत राहावा अशी अपेक्षा आहे.'

गेली २५ वर्षे हा स्नेह दिवसेंदिवस असाच वाढत गेला. कोल्हापुरात ढेरे सर जेव्हा जेव्हा येत तेव्हा तेव्हा ते प्रथम अंबाबाईचे दर्शन घेत आणि मग तेथून ५-१० पावलांवर असलेल्या माझ्या घरी ते येत असत. तर माझी पुणे वारी त्यांच्या भेटीशिवाय कधी पुरी होत नसे.

**प्रेम आणि प्रेरणा**

१५ ऑगस्ट १९९६च्या एका पत्रात ढेरे सरांची माझ्यासंबंधी असणारी आत्मीयता आणि माझ्या थोड्याफार व्यासंगाबद्दल त्यांना वाटणारा विश्वास पुढील शब्दांत व्यक्त झालेला दिसतो : 'तुमचं पत्र वाचून अंतःकरण भरून आलं. तुमची भेट जर दहा-बारा वर्षांपूर्वी झाली असती, तर तुमच्या स्नेहल सहयोगाच्या बळावर तुमच्या-माझ्या समान आवडीच्या नि व्यासंगाच्या क्षेत्रात काही विशेष घडवणं शक्य झालं असतं, असं पुन्हा पुन्हा मनात येत राहतं.'

गेल्या २५ वर्षांत ढेरेअण्णांसारख्या ज्येष्ठ संशोधकाशी माझा जो पत्रसंवाद होत राहिला तो माझ्यासाठी नेहमी आनंद तर देत होता, परंतु त्याहीपेक्षा एक सृजनशील आणि सत्शील माणूस आपल्या पाठीशी सतत निरपेक्ष भावनेने उभा आहे याचे अप्रूप फार मोठं होते. त्यांचे हे असणे माझ्यासाठी खूप काही देऊन जात होते. आपल्या परिवारातील एखाद्या लेखकाचे नवे पुस्तक प्रसिद्ध होत असताना त्यांना होणारा आनंद आणि ते पुस्तक स्वरूपात लवकर प्रसिद्ध व्हावे म्हणून त्यांच्याकडून केली जाणारी धडपड याचा अनुभव मी माझ्या 'लोकराजा शाहू छत्रपती' आणि 'शाहू छत्रपती आणि लोकमान्य' या दोन्ही ग्रंथांच्या वेळी घेतला आहे. 'शाहू छत्रपती आणि लोकमान्य' या ग्रंथाचे हस्तलिखित अरुण जाखडे यांच्या पद्मगंधा प्रकाशनकडे त्वरित पाठवून द्या, म्हणून पावसात भिजत जाऊन ढेरेअण्णांनी मला तार केली होती, ही आठवण प्रकाशकाकडून प्रथम ऐकताना माझे डोळे पाणावले होते.

अण्णा आपले प्रकाशक किंवा संपादक यांना दिलेला शब्द पाळण्याबाबत कमालीचे दक्ष असत, त्याचा मी नुकताच अनुभव घेतला होता. २० एप्रिल २०१४ ला मी त्यांना भेटावयास दवाखान्यात गेलो. त्या वेळी त्याही अवस्थेत महाराष्ट्र शासनाचा मी संपादित करीत असलेल्या राजर्षी शाहू गौरव ग्रंथाच्या सुधारित तिसऱ्या आवृत्तीसाठी आपला शाहू छत्रपती आणि आर्य समाज यांच्या संबंधावर नवा प्रकाश टाकणारा एक प्रदीर्घ लेख सुपूर्त केला होता. त्यानंतर शरपंजरी



अनुक्रमणिका

पडलेले अण्णा माझ्या या ग्रंथाची सतत चौकशी करीत होते. राजर्षी शाहू गौरव ग्रंथाची सुधारित तिसरी आवृत्ती तयार होताच १३५० पृष्ठांहून अधिक पृष्ठे असणारा ए-४ आकारातील ग्रंथ मुंबईहून मी परत येत असताना २८ मे २०१६ रोजी खास पुण्यात थांबून तीर्थस्वरूप ढेरेअण्णांना भेट देताच ते खूप आनंदून गेले होते. त्यांचे कौतुकाचे शब्द मी विसरू शकणार नाही.

समाजाच्या सर्व क्षेत्रांत- ते राजकारण असो, समाजकारण असो किंवा साहित्य-विज्ञान-कला-संगीत असो; कोणत्याही क्षेत्रामध्ये मोठा मासा लहान माशाला खाऊन टाकत असतो, हा आता सार्वत्रिक नियम आहे तिथे स्नेह, नातीगोती हे सारं काही गौण असते. परंतु ढेरेअण्णा मात्र या नियमाला अपवाद ठरलेले आहेत.

त्यांच्याबाबतचा हा अनुभव माझ्यासारख्या अनेकांनी घेतला आहे.

आठ-दहा वर्षांपूर्वी मी शिवचरित्र लिहिण्याचा माझा संकल्प ढेरेअण्णांच्या एका भेटीत त्यांना सांगितला. शिवचरित्रलेखनाचे शिवधनुष्य उचलण्याचा प्रयत्न करणारे अनेकजण ते अंगावर घेऊन पडणाऱ्यांच्या यादीत आणखी एकाची भर पडेल की काय, असा अभद्र विचारही त्यांच्या मनाला शिवला नाही. याउलट, त्यांनी आपल्या ग्रंथालयातील शिवचरित्र संदर्भातील अनेक दुर्मिळ ग्रंथ माझ्यासाठी खुले केले. इतकेच नव्हे, तर एका कोल्हापूर भेटीत ते माझ्यासाठी 'English Record of Shivaji' सारखा अत्यंत दुर्मिळ ग्रंथ घेऊन आले.

२० सप्टेंबर २००६च्या एका पत्रात ढेरेअण्णा मला लिहितात, 'घरात काही संदर्भ शोधताना 'फॉरीन बायोग्रॉफीज ऑफ शिवाजी' या ग्रंथाची खराब झालेली प्रत (कीटकनाशक पूड घालून प्लॅस्टिक पिशवीत घालून ठेवलेली) हाती लागली. हा ग्रंथ तुमच्या संग्रही नसल्यास लगेच कळवा. मी ते कुरियर सर्व्हिसद्वारा तत्काळ पाठवीन.'

अशा असंख्य आठवणी तीर्थस्वरूप ढेरे अण्णांच्यासंबंधी मनामध्ये पिंगा घालू लागतात.

**बहुजनांची संस्कृती**

महाराष्ट्रातील बहुजनांची संस्कृती आणि एकूण समाजजीवन हे गेली हजारो वर्षे अभिजनांच्या टिंगलटवाळीचा विषय होऊन राहिले आहे. बहुजनांची देवदैवते, धर्माचार, सण-उत्सव, आहार, पोषाख, रूढी-परंपरा, बोलीभाषा, मौखिक-लिखित साहित्य, मनोरंजनाची साधने, रीतिरिवाज, मूल्ये, नीतितत्त्वे इत्यादी असंख्य बाबी, की ज्यांचा 'लोकसंस्कृती' या एकाच संज्ञेने उल्लेख करता येईल ती लोकसंस्कृती अजूनही तथाकथित अभिजनांना आपलीशी वाटत नाही. या संस्कृतीबाबत त्यांच्या मनात कमालीचा तिरस्कार आणि द्वेषभावना वास करीत असे. त्यामुळे महाराष्ट्राची लोकसंस्कृती तशी बहिष्कृतच ठरली होती. इतिहासाचार्य वि. का. राजवाडे, ज्ञानकोशकार केतकर, डॉ. इरावती कर्वे, दुर्गा भागवत, प्र. रा. देशमुख, श्री. म. माटे, प्रभाकर मांडे, डॉ. सरोजिनी बाबर, डॉ. जी. एम. घुर्ये आणि डॉ. रा. चिं. ढेरे हे काही सन्माननीय अभ्यासक अपवाद म्हणून सोडले तर तशी महाराष्ट्राची लोकसंस्कृती अभ्यासकांकडून पूर्णपणे अलक्षितच राहिली. त्यामुळेच म. वा. धोंडांसारखा एखादा गाढा अभ्यासक कैकाडी समाजातील एका कार्यकर्त्याच्या आत्मचरित्रात 'हिवर' या शब्दाचा अर्थ सापडला म्हणूनच आपण ज्ञानेश्वरीतील एका ओवीचा अर्थ चांगल्या प्रकारे समजावून घेऊ शकलो याबद्दल समाधान व्यक्त करतो, तर दुसरीकडे त्याच आत्मचरित्रात 'खर्डा' हा शब्द त्याने खाण्याचा पदार्थ या अर्थाने वापरला आहे. म्हणून अभिजन वर्गातील काही समीक्षक त्यांना धारेवर धरतात, त्यांच्या अज्ञानाची कीव करतात. अशा वेळी रामचंद्र चिंतामण ढेरे या व्रतस्थ ज्ञानोपासकाने गेली ६०-६५ वर्षे मराठी लोकसंस्कृतीचे अक्षरशः दाही दिशांनी जे संशोधन चिंतन, वाचन आणि लेखन केले आहे ते पाहिले की त्यांच्यापुढे नतमस्तक होण्याखेरीज दुसरे काही सुचत नाही.

**पार्श्वभूमी आणि प्रेरणा**

महाभारतात जे नाही ते जगातही नाही, अशा अर्थाचे एक विधान महर्षी व्यासांच्या सर्वस्पर्शी प्रतिभेबद्दल केले जाते. डॉ. रामचंद्र चिंतामण ढेरे या आधुनिक व्यासमहर्षींसंबंधी असेच विधान करावे लागेल. कारण त्यांच्या साहित्यात तत्त्वज्ञान, भाषाशास्त्र, धर्मशास्त्र, दैवतशास्त्र, मूर्तिशास्त्र, पुरातत्त्वशास्त्र, समाजशास्त्र, मानसशास्त्र, स्थळशास्त्र, मानववंशशास्त्र, पुराकथाशास्त्र इत्यादी अनेक शास्त्रांचा सुरेख समन्वय साधलेला आढळतो.

२१ जुलै २०१६ रोजी डॉ. ढेरे आपल्या वयाची शहाऐंशी ओलांडून सत्याऐंशीत प्रवेश करणार होते. गेल्या ६०-६५ वर्षांमध्ये त्यांच्या विविध आणि वैचित्र्य असणाऱ्या ग्रंथांनी शतक केव्हाच ओलांडले आहे. संकल्प आणि सिद्धी यामध्ये परमेश्वराच्या इच्छेची अभेद्य भिंत अनेकदा उभी असते. ही परमेश्वरनिर्मित भिंत विविध रूपांत आपले अस्तित्व प्रकट करते. ती कधी अठराविश्व दारिद्र्याचे रूप धारण करते, तर कधी शरीरप्रकृतीची दुर्बलता म्हणून उभी असते. काही वेळा माणसांचे रूप घेऊन मांजर म्हणून आडवी येते. आपलेच तथाकथित सगेसोयरे, मित्र, हितचिंतक आणि शेजारी दबा धरून बसलेले छुपे शत्रू असतात. आपले संकल्प आणि त्यांची सिद्धी यामध्ये विविध स्वरूपांत उभ्या असणाऱ्या या भिंतीचे दर्शन डॉ. ढेरे यांना नेहमीच घडते. परंतु सामान्यांना अभेद्य वाटणारी ही भिंत फोडून जाण्याचे



अनुक्रमणिका

अलौकिक सामर्थ्य डॉ. ढेरे यांची असामान्य प्रतिभा आणि अक्षय प्रज्ञेमध्ये असल्यामुळे त्यांनी आपल्या संशोधनात्मक लेखनकार्याची ६०-६५ वर्षे आणि त्यावर आधारित ग्रंथनिर्मितीचे शतकच नव्हे, तर त्याहून अधिक ग्रंथांची निर्मिती केली होती. याचा आनंद आणि अभिमान प्रत्येक जाणकार मराठी वाचकाला वाटेल, हे नमूद करण्याचीही गरज नाही.

पुणे जिल्ह्यातील मावळ तालुक्यामधील निगडे या खेड्यात आजोळी रामचंद्र चिंतामण ढेरे यांचा २१ जुलै १९३० रोजी जन्म झाला. त्यांच्या वयाच्या पाचव्या वर्षी आईवडिलांचे निधन झाले, परंतु त्यांची आजीच त्यांची आई झाली. ढेरे आणि त्यांची धाकटी बहीण या दोघांना तिने खूप जपले. घरात अठराविश्व दारिद्र्य होते. ढेरे आपल्या 'संत, लोक आणि अभिजन' या ग्रंथात एके ठिकाणी सांगतात, 'मला आजही स्पष्ट आठवते आहे, पावसाळ्यात आजोळच्या चंद्रमौळी घराचे छप्पर शतधारांनी गळायचे आणि दुःख-दारिद्र्याने गांजलेल्या आजीचे डोळे सहस्रधारांनी गळायचे. व्यथांच्या अग्निहोत्रात आजीचे उभे आयुष्य आत-बाहेर होरपळून गेले होते. व्यथा तिच्या स्वतःच्या आणि तिने ज्यांच्यावर जिवाभावाने प्रेम केले त्या माणसांच्या; परंतु असे असूनही तिने जीवनक्रम फिरतच होते- ऋतुचक्राच्या सर्व आऱ्यांवर जागती दृष्टी ठेवून फिरत होते.'

महाराष्ट्राच्या लोकसंस्कृतीची ही अपूर्व शोधयात्रा डॉ. रा. चि. ढेरे हा व्रतस्थ ज्ञानोपासक यात्रिक गेली ६५ वर्षे पंढरीच्या वारकऱ्याच्या निष्ठेने अखंडपणे करतो आहे. त्याला विश्रांती माहीत नाही. त्यामुळेच 'खंडोबा', 'तुका झालासे कळस', 'दलितांचा कैवारी भार्गवराम', 'नामयाची जनी', 'ही चिरंतनाची वाट', 'मुसलमान मराठी संतकवी', 'विविधा', 'लोकसंस्कृतीची क्षितिजे', 'गंगाजळी', 'संतसाहित्य आणि लोकसाहित्य', 'महाराष्ट्राचा देव्हारा', 'लज्जागौरी', 'श्री विठ्ठल : एक महासमन्वय', 'लोकदैवताचे विश्व', 'लोकसंस्कृतीचे उपासक', 'नाथ संप्रदायाचा इतिहास', 'दत्तसंप्रदायाचा इतिहास', 'भारतीय रंगभूमीच्या शोधात', 'लोकसाहित्य : शोध आणि समीक्षा', 'लौकिक आणि अलौकिक', 'संत, लोक आणि अभिजन' यासारखे संतसाहित्य आणि लोकसाहित्य यांच्यामधील अनुबंधाचा मागोवा घेत अभिजनांची संस्कृती आणि बहुजनांची संस्कृती यांच्यातील आतापर्यंत जाणीवपूर्वक दुर्लक्षित केल्या गेलेल्या परस्परसंबंधाचा उलगडा करणारे मराठी लोकसंस्कृतीचे अपूर्व दर्शन घडविणारे अभिजात ग्रंथ त्यांच्याकडून लिहिले गेले.

मावळ खेड्यातून एक तेरा वर्षांचे पोर आईहून आई झालेल्या आजीच्या बोटाला धरून पुण्यासारख्या सनातन संस्कृतीच्या बालेकिल्ल्यात येते. कुटुंबनिर्वाहासाठी मुद्रितशोधकाचे काम स्वीकारते. रात्री ग्रंथपाल म्हणून राबते. दारिद्र्याची सोबत नित्याची असते. परंतु त्याचे दुःख कमी म्हणून की काय, मामा आणि आजी या जिवाभावाच्या माणसांचे अकस्मात मृत्यू होतात. या सर्व प्रतिकूल परिस्थितीत त्याची ज्ञानसाधना अखंडपणे चालू असते. मराठी लोकसंस्कृतीचा हा प्रकांड पंडित-, ज्ञानमहर्षी मावळ खेड्यात असताना तुकोबाच्या नावाने अभंग रचीत होता, नाथांच्या नावाने गौळणी लिहीत होता. इतकेच नव्हे, तर हे ब्राह्मणाचे पोर महारवाड्यातल्या होतकरू तमासगीरांना लावण्याही करून देत होते. याचा अर्थ ढेरे यांच्या लेखनाचा श्रीगणेशा काव्यातून झाला होता. त्यांचा मूळचा पिंडच कवीचा असल्यामुळे महाराष्ट्राच्या सांस्कृतिक इतिहासाचे संशोधन ते स्वाभाविक जिव्हाळ्याने करू शकले.

दहा वर्षांच्या ब्राह्मण पोराला शंभर वर्षांच्या क्षत्रियाने आपला बाप समजून अहो-जाहो केले पाहिजे, हा मनुस्मृतीचा संस्कार अजूनही खेड्यापाड्यांतून पूर्ण लयाला गेला नाही. डॉ. ढेरे यांचे मावळ खेडे त्याला अपवाद नाही. परंतु ढेरे यांची आजी व तिचे कुटुंब मात्र याबाबत पूर्ण वेगळे होते. ती गावातील सर्व समाजाशी आदराने वागत होती. महारवाड्यातील आजारी बाळाला औषधोपचार करायला किंवा अडलेल्या बाईची सुटका करावयास ती जात होती. गावातील कोणी राणबा महार आपल्या पत्नीला विवस्त्र करून मारीत असताना, सारा गाव हा फुकटचा तमाशा पाहत उभा असताना त्या विवस्त्र बाईच्या अंगावर आपले आलवण घालीत होती. आजीचे हे वर्तन गावकऱ्यांना 'भ्रष्टाचार' वाटत होते. त्यामुळे ढेरे बहीण-भावंडांच्या वाट्याला बहिष्कृत जीवन जगण्याचे आणि सोसण्याचे दुःख येत होते. जणू ती आधुनिक काळातील 'संन्याशाची पोरे' होती.

एकीकडे अभिजनांचे बहुजनांशी होणारे माणुसकीशून्य वर्तन आणि दुसरीकडे गावाच्या देवालयाच्या मंडपात पारावर आणि आजोळच्या चंद्रमोळी घरात ऐकलेली पोथी-पुराणे किंवा 'ऐका परमेश्वरा गणेशा, तुझी कहाणी, निर्मळ मळे, उदकाचे तळे, बेलाचा वृक्ष, सुवर्णाची कमळे, विनायकाची देवळे-रावळे मनाचा गणेश मनी वसावा. हा वसा कधी घ्यावा, श्रावण्या चौथी घ्यावा...' अशा ताला-छंदात प्रकटणाऱ्या कहाण्या याच त्यांच्या लोकसंस्कृतीच्या शोधयात्रेतील मूलभूत प्रेरणा ठरल्या आहेत. डॉ. ढेरे या संदर्भात लिहितात, 'माझे मन या कहाण्यांच्या केवळ तालानेच नव्हे, तर त्यांच्या विषयाच्या गूढतेनेही प्रथमपासूनच भारलेले आहे. गेली कित्येक वर्षे मी अनावर ओढीने एकेका कहाणीची अंतःकहाणी उलगडण्याचा प्रयत्न करतो आहे; परंतु तो शोध अजूनही अपुराच राहिला आहे. या अशा अपुरेपणाच्या खंतीतून माझ्या शोधाच्या ऊर्मी चैतन्याने

रसरसलेल्या आहेत आणि शोध-साक्षात्काराच्या विलक्षण आनंदाचे क्षण मला प्रेरणा देत राहिले आहेत. या क्षणांची धुंदी जगण्यात ह्या साऱ्या व्यथा-वेदनांचा विसर पडतो. शोधसाक्षात्कार अनुभवताना आणि तो अक्षरात अवतरताना व्यावहारिक लाभ-हानीचा हिशेब निमिषभरही मनाला स्पर्श करीत नाही. असतो तो निखळ आनंदच आनंद!'

**लोकसंस्कृतीचा भाष्यकार**

डॉ. रामचंद्र चिंतामण ढेरे या महाराष्ट्रातील लोकसंस्कृतीच्या भाष्यकाराच्या नावावर आजमितीला जे शंभरहून अधिक ग्रंथ जमा आहेत त्यापैकी सुमारे पन्नास ग्रंथ ही त्यांनी स्वतंत्र निर्मिती आहे. हे सर्व स्वतंत्र ग्रंथ आणि त्यांची सर्व संपादने यामध्ये अभिजनांची संस्कृती आणि बहुजनांची लोकसंस्कृती यांच्यातील अनुबंध शोधून अवघा मराठी समाज गुण्यागोविंदाने एकत्रित राहील-नांदेल, हाच ध्यास घेऊन त्यांची मांडणी केलेली आढळते. म्हणूनच ते आपल्या 'भारतीय रंगभूमीच्या शोधात' या प्रसिद्ध ग्रंथात मोठ्या विनयाने सांगतात, 'धर्म, कला आणि संस्कृतीची इतर अंगे अभ्यासताना आपल्याला असे सतत जाणवत राहते, की इथे लोकपरंपरा आणि अभिजनांची विदिग्ध परंपरा यांची निरंतर देवाण-घेवाण चालू आहे. विदग्ध परंपरा लोकपरंपरातून उदय पावतात. उत्क्रांत होतात आणि लोकपरंपराही विदग्ध संस्कार स्वीकारीत राहतात. आपल्या सांस्कृतिक जीवनात हजारो वर्षांपासून सातत्याने चालू असलेल्या या प्रक्रियेचे भान ठेवून जर आपण आपल्या देव-देवतांचा, व्रतोत्सवांचा, यात्रा-जत्रांचा, विधिविधानांचा, श्रद्धा-संकेतांचा आणि या सर्वांच्या साहचर्याने संचारणाऱ्या कला क्रीडांचा आस्थेने अभ्यास चालू ठेवला तर आपल्या प्रदीर्घ परंपरेतील अनेक कूटांवर आपण अद्भुत प्रकाश टाकू शकतो नि अज्ञाताची अनेक दालने प्रकाशित करू शकतो. हे भान अभ्यासकाने सतत जागे ठेवले की त्याची अध्ययनदृष्टी आपोआपच बहुमुखी होत जाते, अनेक ज्ञानशाखांचा समन्वय साधून सत्सशोधनाकडे झेप घेते आणि (विशेषज्ञांच्या परिभाषेत सांगायचे झाले तर) धर्म-कलादी संस्कृतीच्या अंगाचे समाजशास्त्र मांडायला सहज समर्थ बनते.'

मराठी लोकसंस्कृतीमधील एकात्मता साधणे हाच केवळ डॉ. रा. चिं. ढेरे यांचा ध्यास नाही. 'भारत की मौलिक एकता'सारखा अभिजात ग्रंथ लिहिणारे आणि वेद, पुराणे, भारतीय लोकभाषांमधील साहित्यमूर्ती विज्ञान, समाजशास्त्र, इतिहास, लोकसंस्कृती इत्यादी विषयांना आपल्या लेखणीचा परिसस्पर्श करणारे डॉ. वासुदेव शरण अग्रवाल हा आधुनिक व्यास त्यांचे श्रद्धास्थान आणि प्रेरणास्थान होते. त्यामुळे डॉ. ढेरे भारतीय समाजाची जडणघडण म्हणजे या देशातील आदितम संस्कृती, द्रविडांची सिंधू संस्कृती आणि आर्यांची वैदीक संस्कृती यांच्यातील प्रदीर्घ काळ चालू असणारी सांस्कृतिक आदान-प्रदानाची प्रक्रिया आहे, हे मत सातत्याने मांडीत आहेत. याचा अर्थ मराठी लोकसंस्कृतीच्या एकात्मतेचा ध्यास असणाऱ्या डॉ. ढेरे यांना भारतीय समाजाच्या एकात्मतेचीही तितकीच ओढ आहे.

'लौकिक आणि अलौकिक' या आपल्या छोट्याशा ग्रंथात ते 'निषादांची देणगी' या लेखात भारतीय आदिवासींचे भारतीय संस्कृतीमधील योगदान स्पष्ट करतात. बहुसंख्य भारतीयांना धर्महृद्य वाटणाऱ्या गंगामाईचे गंगा हे नाव निषादांच्या आदिवासींच्या भाषेतील खोंग किंवा किआंग या सर्वनामापासून घेतले आहे. त्या दोन्ही शब्दांचा निषाद भाषेत नदी असा अर्थ आहे, हे ते ठामपणाने सांगतात.

त्याचप्रमाणे वीस या संख्येने मोजण्याची प्रथाही निषादांचीच होय. अजूनही खेड्यापाड्यांतून तीच प्रथा आहे. मराठीतील 'अठरा विश्वे दारिद्र्य' हा वाक्प्रचार त्या गणनापद्धतीचा एक अपभ्रष्ट आविष्कार आहे. 'अठरा विसा' चुकून 'अठरा विश्वे' झाले. 'अठरा विसा' म्हणजे १८×२०= ३६० दिवस. म्हणजेच वर्षातील सर्व दिवस दारिद्र्य. भातशेती, नारळ, केळी, नागवेल, सुपारी, हळद, वांगी यांची लागवड; हत्ती माणसाळविणे किंवा कोंबड्या पाळणे या सर्वच गोष्टी हे आदिवासींचे भारतीय संस्कृतीमधील महत्त्वाचे योगदान आहे. डॉ. रा. ढेरे यांचे हे विवेचन वाचले की भारतीय समाजाच्या विविधतेतील एकतेचा उलगडा होण्यास विलंब लागत नाही.

**महाराष्ट्राचा देव्हारा**

अभिजन परंपरा आणि लोकपरंपरा यांचा समन्वय साधणे हाच डॉ. ढेरे यांचा सदैव ध्यास असल्यामुळे पुणे विद्यापीठाच्या साहित्यसम्राट न. चिं. केळकर स्मारक व्याख्यानमालेत दिनांक १३ ते १६ डिसेंबर १९७६ या दिवशी जी चार संशोधनात्मक लिखित स्वरूपातील व्याख्याने दिली त्यामध्येही ते याच विचारांचा 'जागर' करताना दिसतात. तो त्यांच्याच प्रासादिक भाषेत वाचणे अधिक उद्बोधक ठरेल. ते लिहितात, 'मराठी संत हे प्राधान्याने सामाजिक विषमतेने पीडित बनलेल्या वर्गातून उदयास आले होते, किंवा त्या विषमतेची बोच ज्यांच्या विवेकवृत्तीला निर्माण झाली आहे अशा अपवादभूत व्यक्तींपैकी होते. समाजाचं धुरीणत्व ज्यांच्याकडे होते ते बहुतांना दूर लोटीत होते. हा शूद्र आहे, हा पतित आहे, हा अतिशूद्र आहे, हा अस्पृश्य आहे, अशी नाना बिरुदं बहाल करून बहुतांश समाजाला त्यांनी आत्मोद्धाराच्या आत्मविश्वासापासून वंचित केलं होतं. अशा विषमताग्रस्त समाजाला अशा एका विराट मातेची आंतरिक ओढ लागून राहिली होती, की जी सर्वांना समानेतने जवळ घेईल, जी कुणाला दुष्ट म्हणून दूर लोटणार नाही. सर्वांचा स्वीकार

करणारी, सर्वांना सावरणारी अन् सर्वांना वात्सल्याची समान सावली देणारी, सर्वांना सावरणारी अन् सर्वांना तारणारी अशी माता ही समूहमनाची आंतरिक गरज बनली होती.' वत्सल मातेविषयीच्या या आंतरिक ओढीतूनच संतांनी विठ्ठलाचं चरित्र घडवलं आहे. वैदिक परंपरेशी स्थूल संबंध राखणारा अन् अवैदिक परंपराशी आपलं काही नातं नाही, असा भासवणारा संतांचा विठ्ठल अंतरंगदृष्ट्या मात्र बुद्धाच्या करुणेने भारलेला आहे. संतांना गवसलेला हा लोकप्रिय लोकदेव आपल्यात अनेक साधनप्रवाहांचा महासमन्वय साधीत राहिला असला तरी तो सत्याची असाधारण प्रतिष्ठा वाढवणारा आहे, हिंसेचा ठाव पुसणारा आहे अन् करुणेचा महासागर आहे. बुद्धाच्या हृदयधर्माशी जवळीक साधणारं त्याचं हे अंतरंग वत्सल मातृत्वाशी समरूप असल्यामुळे तो पुरुष असूनही संतांनी त्यालाच 'माउली' मानलं अन् स्त्री-पुरुष भिन्नतेच्या पलीकडे असणारं परिपूर्ण आदिमातृत्व त्याच्या ठायी उत्कटतेने अनुभवलं.'

**श्री विठ्ठल : एक महासमन्वय**

'श्री विठ्ठल : एक महासमन्वय' हा डॉ. रामचंद्र चिंतामण ढेरे यांचा गेल्या अर्धशतकातील संशोधनकार्याचा जणू कळस ठरावा. संस्कृत पुराणे, संतसाहित्य, दैवतशास्त्र, पुराणशास्त्र, धर्मशास्त्र, समाजशास्त्र, भाषाशास्त्र इ. विविध शास्त्रांचा समन्वय साधीत त्यांनी गेली आठ शतके मराठी लोकमानसावर अभूतपूर्व आणि अखंड मोहिनी टाकणाऱ्या पंढरीच्या विठ्ठलाचा जो शोध घेतला तो केवळ अद्भुत आणि अपूर्व मानावा लागेल. संतांपासून ते सामान्यांपर्यंत पंढरीचा विठोबा नेहमीच जिव्हाळ्याचा आणि जिज्ञासेचा विषय होऊन राहिला आहे. संत आणि सामान्यांना पंढरीच्या प्रभूबाबत जो जिव्हाळा वाटतो तो योग्यच आहे, हे तर डॉ. ढेरे यांचा हा अपूर्व ग्रंथ पटवून देईलच. परंतु त्या सावळ्या ब्रह्माबाबत जे अनेक प्रकारचे प्रश्न उभे राहतात किंवा शंका निर्माण होतात त्यांची संमर्पक उत्तरे आणि निर्विवाद निरसन करण्याचे प्रचंड सामर्थ्य या 'ग्रंथराजा'च्या ठायी आहे, हे त्या ग्रंथाचे समग्र वाचन केल्यावर लक्षात येते. मग माझ्यासारख्या समाजशास्त्राच्या अभ्यासकाला पंढरीचा हा राणा विठ्ठल डॉ. इरावती कर्वे यांच्यासारख्या विदुषीचा बॉयफ्रेंड का झाला, तो त्यांना सदैव पालवीत का होता, या प्रश्नांची उत्तरे मिळण्यास विलंब लागत नाही.

डॉ. ढेरे यांच्या या ग्रंथाचे नावच मुळी 'श्री विठ्ठल : एक समन्वय' असे आहे. त्यामुळे त्यांच्या एकूण संशोधनकार्याचे अभिजन संस्कृती आणि बहुजन संस्कृतीमधील एकात्मतेचा मागोवा घेणे हे जे मध्यवर्ती सूत्र आहे त्याची प्रचिती या ग्रंथाच्या प्रत्येक पानापानावर येते. त्यांचा हा बृहद् शोधप्रकल्प सुमारे पाच वर्षे चालू होता. त्यासाठी त्यांनी महाराष्ट्र आणि कर्नाटक राज्यांत अनेक शोधयात्रा केल्या. त्या शोधयात्रेत कधी अगदी निर्जल एकादशीचा त्यांना अनुभव आला, तर काही वेळा चुरमुरे-फुटाणे खात आणि वाटेवरील बस स्टँडचे 'विश्रांतिधाम' करीत हा संशोधनवेडा अवलिया भटकत राहिला. त्यासाठी शेकडो शोधसाधने संकलित केली. त्यामधून हा अभिजात 'ग्रंथराज' आकाराला आला.

सामाजिक शास्त्रात संशोधकाच्या ठायी असणारी स्वसमूहश्रेष्ठतावादाची कमी-जास्त प्रमाणातील प्रवृत्ती आणि त्याचे व्यक्तिगत हितसंबंध हे दोन मोठे अडथळे संशोधनातील वस्तुनिष्ठतेबाबत येत असतातच. परंतु तिसरा एक प्रमुख अडथळा असतो तो म्हणजे सनातन मूलभूतवादी व्यक्तींचे सामाजिक परिवर्तनाच्या नेहमीच आडवे येणे हा असतो. या सर्वच अडथळ्यावर रा. चिं. ढेरे यांनी आपल्या साक्षेपी आणि सहनशील या गुणांच्या आधारावर मात केली. त्यामुळेच पंढरपुराच्या मंदिरात सध्या जी विठ्ठलमूर्ती आहे ती मूळची नसून मूळ मूर्ती सध्या माढा या गावी असणाऱ्या मंदिरात आहे हे ते ठामपणे सांगतात. हे कटू सत्य त्यांनी सांगितल्यामुळे त्यांच्यावर मारेकरी घालण्याचा प्रयत्न झाला. जाहीर सभांमधून त्यांना निमंत्रित करून त्यांचे अपमान करण्यात आले. परंतु या समन्वयवादी, सत्शील संशोधकाने हे अप्रतिष्ठेचे अपमानाचे जहर सहज पचवून टाकले आहे. एकीकडे 'श्री विठ्ठल : एक समन्वय' या त्यांच्या 'ग्रंथराजा'ला सनातन्यांचा विरोध होता असताना दुसरीकडे त्याच ग्रंथराजाला साहित्य अकादमीचा पुरस्कार लाभून महाराष्ट्राच्या साहित्यिक विश्वात अपरंपार गौरव होत होता.

**लोकसंस्कृतीचा आधारवड**

महाराष्ट्रातील अभिजनवर्ग बहुजनांच्या लोकसंस्कृतीचा जोपर्यंत आदर करीत नाही, त्या संस्कृतीकडे आपलेपणाच्या भावनेतून पाहत नाही, तोपर्यंत महाराष्ट्राच्या सर्वांगीण विकासाची प्रक्रिया गतिमान होऊच शकणार नाही. या विचारांचा सदैव जागर हेच डॉ. रा. चिं. ढेरे यांच्या संशोधनाचे आणि एकूण व्यक्तिमत्त्वाचे प्रभावी सूत्र आहे. त्यामुळेच ते संतसाहित्य आणि लोकसाहित्य यांचा अनुबंध शोधीत असताना संतसाहित्याची निर्मिती दलित साहित्याला कशी अनुकूल ठरली, पोषक ठरली याचे सुंदर, लक्षवेधी विवेचन ते आपल्या 'संतसाहित्य आणि लोकसाहित्य' या प्रसिद्ध ग्रंथात करतात. विख्यात साहित्य समीक्षक आणि दलित साहित्याचे सहृदयी भाष्यकार प्रा. रा. ग. जाधव यांच्या मतांचा आधार घेत हे विवेचन ते करतात. संतांनी आपल्या साहित्यनिर्मितीत 'मूळचा झरा' जपला. कोणतीही कृत्रिम बंधने त्यांनी लादून घेतली नाहीत. साहित्यसौंदर्याचे पूर्वसिद्ध नमुने त्यांनी नाकारले. तिसरी गोष्ट, त्यांनी भगवद्गीता,

रामायण, महाभारत इत्यादी ग्रंथांचा आपणास हवा तसा उपयोग करून घेतला. चौथी गोष्ट, आपले साहित्य समाजाला देत असताना त्यांना कधीही आपलेपणाने तर कधी रागावून समाजाला विश्वासात घेतले. आणि पाचवी गोष्ट, संतांनी हे सर्व करीत असताना एकाकी जीवन जगण्याची अपूर्व जिद्द दाखविली. संतसाहित्याची ही पंचशील तत्त्वे दलित साहित्याने स्वीकारली तर ही चळवळ अधिक वेग घेईल आणि खऱ्या अर्थाने लोकसाहित्याची चळवळ होईल असा त्यांचा ठाम विश्वास आहे.

'लोकसाहित्य : शोध आणि समीक्षा' हा डॉ. ढेरे यांचा ग्रंथ प्रत्येक वाचकाने तर वाचलाच पाहिजे असे वाटते, परंतु समाजशास्त्राच्या अभ्यासकाने त्याची पारायणे करावीत अशा योग्यतेचा हा ग्रंथ आहे. या ग्रंथात ते इतिहासाचार्य राजवाड्यांच्या लोकसाहित्यभ्यासाचा थोडक्यात मागोवा घेतात. वि. का. राजवाडे हे तर त्यांचे एक प्रभावी आणि प्रेरणादायी श्रद्धास्थान होय. डॉ. अशोक कामत यांच्यासारख्या संतअभ्यासक वि. का. राजवाडे यांच्या संतसाहित्य खंडाच्या प्रस्तावनेत डॉ. ढेरे हे राजवाडे यांचे कसे निस्सीम भक्त आहेत हे सांगून त्यांनीच आपणास इतिहासार्च राजवाडे यांच्या संशोधनकर्तृत्वाची आदरणीय बाजू कशी दाखवून दिली हे प्रांजळपणे मान्य करतो. याच ग्रंथात ते मराठीमधील शिव्यांच्या समाजशास्त्रीय संदर्भांचा उलगडा करून दाखवतात. दुसरीकडे 'साने गुरुजींचे स्त्रीजीवन' या लेखात साने गुरुजींनी संकलित केलेल्या स्त्री जीवनविषयक ओव्यांवर प्रकाश टाकतात.

'लज्जागौरी' हा डॉ. रा. चिं. ढेरे या अलौकिक शक्तीचे म्हणजेच या विश्वाला असणारे ईश्वराच्या अधिष्ठानाचे अस्तित्व श्रद्धापूर्वक स्वीकारणाऱ्या सत्शील आणि पापभीरू संशोधकाचा एक अत्यंत धाडसी ग्रंथ होय. लज्जागौरी म्हणजे स्त्रीयोनीरूप देवता होय. पृथ्वी किंवा भूमातेच्या ठायी असणाऱ्या सर्जनशीलतेची ही प्रतीकात्मक पूजा होय. लज्जागौरी ही मातृदेवी आहे, महामाता आहे. ती स्त्रीच्या लैंगिकतेची पूजा नसून तिचे मातृत्व सन्मानित करण्याचे ते अपूर्व कर्तव्य आहे. परंतु ही पूजा बांधीत असताना डॉ. ढेऱ्यांसारखा पापभीरू संशोधक आपली अपराधीपणाची जाणीव लपवू शकलेला नाही, हे जरी सनातनी टीकाकारांनी लक्षात घेतले असते तरी त्यांच्याकडून अप्रत्यक्षरीत्या का होईना, लोकसंस्कृतीचा आदर केला गेला असता.

लोकसंस्कृतीचे चिंतन, मनन आणि त्यासंबंधीचे संशोधनात्मक लेखन ही तर डॉ. ढेरे यांची देवदत्त प्रवृत्ती आणि प्रकृती असावी असे सतत वाटत राहते. आतापर्यंत गावगाड्याबाहेरील लोकसंस्कृतीचा कोणी कधी विचारच केला नव्हता. गावगाड्याबाहेरील जग हे पूर्ण दुर्लक्षित होते. कैकाडी समाजातील एका कार्यकर्त्याचे आत्मचरित्र प्रसिद्ध होताच 'या जगाचा आम्ही कधी विचारच केला नव्हता' अशी जाहीर कबुली यशवंतराव चव्हाण यांच्यासारख्या सुसंस्कृत लोकनेत्याला द्यावी लागली होती. १९१५ मध्ये त्रिं. ना अत्र्यांसारख्या ब्रिटिश प्रशासनातील मुलकी अधिकाऱ्याने 'गावगाडा' या ग्रंथात या समाजाचा विचार केलेला दिसतो. परंतु त्यांच्या विचारात गावगाड्याबाहेरील जगासंबंधी कमालीचा तिरस्कार आणि घृणा दिसते. प्रभाकर मांडे यांच्यासारखा एखादा अभ्यासक वगळता हे गावगाड्याबाहेरील जग कधी कोणी अभ्यासकाने आपल्या अध्ययन-संशोधनाच्या कक्षेत घेतलेच नव्हते. परंतु डॉ. ढेरे यांनी आपल्या 'लोकसंस्कृतीची क्षितिजे', 'लोकसंस्कृतीचे उपासक' आणि 'महामाया' या डॉ. तारा भवाळकर यांच्या सहयोगाने लिहिलेल्या ग्रंथात या गावागाड्याबाहेरील जगाचा साक्षेपी शोध घेतलेला आढळतो. डॉ. ढेरे सांगतात, 'लोकसंस्कृती आणि तिच्या उपासकांचा परिचय घडवून देण्यात उपचाराची अलिप्तता नसून, जिव्हाळ्याची जवळीक आहे.' 'दान पावलं दान पावलं...पंढरपुरात इठोबा रायाला' किंवा 'गोविंदारामा हो, गोपाळारामा जी जी' असा गजर करीत येणाऱ्या, मोरपिसाचा मुकुट घालणाऱ्या वासुदेवाच्या योगदानासंबंधी ते मोठ्या जिव्हाळ्याने सांगतात. 'या कृष्णकथांप्रमाणेच भक्तिमहिमा सांगण्यासाठीही वासुदेव अनेक कथागीते गात असतो. तो कधी 'तुळस वंदावी वंदावी' असा गृहिणींना संदेश देईल, तर कधी 'अवो जनाबाईच्या भक्ती देव गुंतला' अशी त्या साध्या-भोळ्या जनाबाईच्या भक्तविजयाची गाथा आळवील. कधी चांगुणेच्या सत्त्वपरिक्षेची गाथा गाईल, तर कधी कबीराच्या अद्भुत अतिथ्यशीलतेची कहाणी सांगेल.'

असा हा लोकसंस्कृतीचा व्रतस्थ संशोधक बहुजनांच्या सर्वच सामाजिक चळवळींकडे मोठ्या आस्थेने आणि अपेक्षेने पाहत होता. त्यामुळे 'व्रजसूची'सारखे जातिभेद निर्मूलनावर प्रहार करणारे त्याला पालवीत राहतात. महात्मा फुले यांची सत्यशोधक चळवळ त्यांच्या चिंतनाच्या विषय होऊन राहते. शाहू छत्रपतींच्या अस्सल कागदपत्रांचे खंड त्यांना लोकराजा शाहू छत्रपतींच्या जीवनकार्याचा वेगळ्या दिशेने अभ्यास करण्यासाठी आव्हान देत राहतात. इतकेच नव्हे, तर 'शिखर शिंगणापूरचा श्री शंभू महादेव' या ग्रंथात ते शिवछत्रपतींचा कुलस्वामी श्री शंभू महादेव आणि शिखर क्षेत्रात त्याची प्रतिष्ठापना करणारे भोसले घराणे यांच्या दक्षिण संबंधाची शोधकथा सादर करतात. त्यांचा हा ग्रंथ अधिक उत्पातक्षम ठरला. चहुबाजूंनी त्यांच्यावर प्रहार झाला.

त्यांच्यावर अनेक Below the Belt (कमरेखालील वार) झाले. वसंत पळशीकरांसारख्या संशोधकांनी ढेरे सरांचे



अनुक्रमणिका

हे संशोधन पूर्णपणे अमान्य केले. परंतु ढेरे सरांनीच या ग्रंथाच्या प्रस्तावनेत अतिशय नम्रपणाने लिहून ठेवले आहे– 'संशोधक–अभ्यासक–लेखक हा कोणी लौकिक अर्थाने शास्ता नसतो. त्याचे म्हणणे–लिहिणे म्हणजे राजाज्ञा नव्हे, त्याचमुळे मी येथे अखंड केलेले पूर्वग्रह हेच परमसत्य आहे, असे मानणाऱ्या सर्व क्षेत्रांतील सांप्रदायिकांचे श्रद्धास्वातंत्र्य अबाधितच आहे. माझ्या लिहिण्यामुळे ते त्यांनी सोडावे असे मी कसे सांगेन?' ढेरे सरांची ही भूमिका जाणकार वाचक आणि सुज्ञ टीकाकारांनी लक्षात घेतली की या ग्रंथाची उत्पातक्षमता संपण्यास विलंब लागणार नाही असे प्रस्तुत लेखकाला प्रांजलपणे वाटते.

इतिहासाचार्य वि. का. राजवाडे किंवा ज्ञानकोशकार केतकर यांच्यासारख्या अभ्यासकांचा संशोधन साधनांचे संकलन करण्यात खूप वेळ काळ व्यतीत झाला. त्यामुळे त्यांच्या साहित्यनिर्मितीवर प्रतिकूल परिणाम झाला. परंतु डॉ. ढेरे या ग्रंथवेड्या अभ्यासकाकडे आजमितीला सुमारे ४०,००० ग्रंथ आहे, नियतकालिकांचे तीन हजारांवर बांधीव खंड आहेत. त्यांचा हा अपूर्व ग्रंथसंग्रह पाहण्याची संधी प्रस्तुत लेखकाला अनेक वेळा लाभलेली आहे.

अशा या लोकसंस्कृतीच्या आधारवडाची सावली गेली २५ वर्षे मी उपभोगत होतो. त्यांच्या नव्या नव्या ग्रंथांच्या जिव्हाळापूर्ण भेटी या ज्ञानदेवांचा 'प्रसाद' म्हणून भक्तिभावाने स्वीकारत होतो. आपल्या परिवारातील एखाद्या लेखकाचे नवे पुस्तक प्रसिद्ध होत असताना त्यांना होणारा आनंद आणि वाटणारा अभिमान याची प्रचिती मी घेतली आहे. त्यांचे अकृत्रिम प्रेम आणि प्रेरणा यांचा लाभ हे मी माझे परमभाग्य मानतो. म्हणूनच ज्या लोकराजा शाहू छत्रपतींनी अभिजन संस्कृतीने आपला वर्णवर्चस्वाचा अहंकार टाकून देऊन बहूजन संस्कृतीला आपले म्हणावे यासाठी स्वतःचे राज्यच नव्हे तर प्राणदेखील पणाला लावले, त्या लोकराजा शाहूछत्रपतींचे चरित्र सांगणारा माझा ग्रंथ डॉ. रामचंद्र चिंतामण ढेरे या ज्ञानमहर्षीला अर्पण करून त्यांच्याविषयीची जाहीर कृतज्ञता व्यक्त करण्याची संधी मी घेतली होती. कारण डॉ. ढेरे यांनी अभिजनांना बहुजनांच्या लोकसंस्कृतीकडे पाहण्याची नवी दृष्टी प्राप्त व्हावी यासाठी जी आयुष्यभर धडपड चालविली होती ती केवळ अपूर्व आणि अजोड होती.

आत ही धडपड संपली आहे. लोकसंस्कृतीचा आधारवड आता कोसळून पडला आहे.

◆

**रमेश जाधव**

---











लेख

अरुण जाखडे

# भारताचे थोर संशोधक – डॉ. रा. चिं. ढेरे



संशोधनाच्या क्षेत्रात नवनव्या व कित्येक वेळा अज्ञात ज्ञानशाखांचा अभ्यास करण्यात आयुष्यभर मग्न राहिलेले अण्णा आज नाहीत ह्याची जाणीव क्लेशदायक आहे. आपल्या संशोधनकार्याला रसिकतेची जोड देतानाच ज्ञाननिष्ठा, आत्मनिष्ठा आणि आत्मशोध घेण्यात आपल्या आयुष्याची साठ-पासष्ट वर्षे अण्णांनी समर्पित केली. त्यात त्यांच्या हाती जे आले, त्यामुळे केवळ त्यांचेच नाही, तर आपणा सर्वांचेच सांस्कृतिक जीवन उन्नयित झाले आहे. एक नवा व मोठा ज्ञानसंचय त्यांनी आपल्या हाती दिला आहे तो अमूल्य आहे. त्यांचे हे ऋण आपण अतिशय नम्रपणे मान्य केले पाहिजे व कृतज्ञ राहिले पाहिजे.





काही माणसांचे कार्य इतके थोर असते, की त्यांना 'युगप्रवर्तक' म्हणावे की 'युगान्तक' अशा पेचातच पडावे. आधीच्या काळाचे, इतिहासाचे, एवढेच नव्हे, तर संपूर्ण युगाचेच सांस्कृतिक भान त्यांना उमजलेले असतेच, पण ते इतरांना देण्याचेही सामर्थ्य त्यांच्याकडे असले, तर युगान्तक हा पुढला मार्ग स्पष्ट करत नव्या दिशादर्शन घडवून आणतो. पुढे येणाऱ्या नव्या युगाची चाहूल त्याला नसते असे नाही, पण आपल्या समकालीन व अगोदरच्या काळातल्या धर्म, समाज आणि संस्कृतीच्या चढ-उताराच्या टप्प्याचे आणि त्यातून आविष्कृत होणाऱ्या मानवसमूहाच्या ज्ञानव्यापाराचे, इतिहासाचे, सांस्कृतिक व धार्मिक परंपरांचे मार्ग शोधण्याची क्षमता अशा व्यक्तींकडे असते. इतिहासाचार्य राजवाडे, धर्मानंद कोसांबी, श्री. व्यं. केतकर, रा. गो. भांडारकर, वासुदेवशास्त्री खरे, वा. वि. मिराशी अशा महान युगप्रवर्तक व युगान्तक विद्वानांत डॉ. रा. चिं. ढेरे हे शेवटचेच नाव म्हणावे लागेल.

संशोधनाच्या क्षेत्रात नवनव्या व कित्येक वेळा अज्ञात ज्ञानशाखांचा अभ्यास करण्यात आयुष्यभर मग्न राहिलेले अण्णा आज नाहीत ह्याची जाणीव क्लेशदायक आहे. आपल्या संशोधनकार्याला रसिकतेची जोड देतानाच ज्ञाननिष्ठा, आत्मनिष्ठा आणि आत्मशोध घेण्यात आपल्या आयुष्याची साठ-पासष्ट वर्षे अण्णांनी समर्पित केली. त्यात त्यांच्या हाती जे आले, त्यामुळे केवळ त्यांचेच नाही, तर आपणा सर्वांचेच सांस्कृतिक जीवन उन्नयित झाले आहे. एक नवा व मोठा ज्ञानसंचय त्यांनी आपल्या हाती दिला आहे तो अमूल्य आहे. त्यांचे हे ऋण



अनुक्रमणिका



आपण अतिशय नम्रपणे मान्य केले पाहिजे व कृतज्ञ राहिले पाहिजे.

अण्णांना जवळून पाहण्याचे, त्यांच्याबरोबर वीस-बावीस वर्षे एकत्र काम करण्याचे भाग्य मला मिळाले. त्या सगळ्या आठवणी संकलित करण्याची आताच घाई करावी असे मला वाटत नाही. एकाच वेळी तीन पातळ्यावर त्यांचे व माझे संबंध होते. एक प्रकाशक म्हणून. तर दुसरा संबंध म्हणजे... आपण प्रकाशक आहोत ही गोष्ट बाजूला ठेवून किंवा पूर्ण विसरून त्यांच्या प्रातिभ सान्निध्यातून आत्मविकासाचा माझा प्रयत्न. याला गुरू-शिष्यासारखेही संबंध म्हणता येतील. तर या दोन संबंधांतून तिसरे निर्माण झालेले नाते म्हणजे मैत्रभावाचे व व्यक्तिगत स्नेहसंबंधाचे. प्रकाशक या नात्याने ते सतत लिहिते राहतील व नव्या पुस्तकांची रचना करत राहतील याला मी आठाही, तर दुसऱ्या संबंधात मीसुद्धा काही लिहिले पाहिजे व मी लिहिता राहावा यासाठी ते आठाही असायचे. अर्थात माझ्या हातून असे लेखन फार घडले नाही. माझ्या लेखनमर्यादांची मला कल्पना आहे. पण गप्पांच्या ओघात जे संवाद व्हायचे, जी माझ्या गतकालीन संस्कृतीविषयीची निरीक्षणे होती, त्यासंबंधी तरी मी लिहावे असे त्यांना वाटायचे. आमच्या ह्या संवादात आई, आत्याही सहभागी असत. ह्या अशा चर्चांचा परिणाम माझ्या 'इर्जिक' ह्या लेखमालेत दिसेल. माझी बौद्धिक भूक भागविण्यासाठी अण्णांच्या घराइतकी योग्य जागा दुसरी नव्हती. वेळोवेळी होणाऱ्या चर्चांतून पुण्याचे जुने सांस्कृतिक जीवन समजून घेता आले, कधी धर्मेतिहासाचे आकलन झाले, कधी मिथकांचे अन्वयार्थ समजून घेता आले, कधी इतिहासाच्या आणि इतिहासकारांच्या मर्यादाही जाणून घेता आल्या. केवळ संतसाहित्यच नव्हे, अर्वाचीन आणि प्राचीन साहित्याच्याच नव्हे, तर आजच्या आधुनिक वाङ्मयावरची त्यांची मतेही जाणून घेता आली. ते बोलताना त्यांच्या डोळ्यांइतकेच त्यांच्या हातांकडेही माझे लक्ष असायचे. कारण ह्या डोळ्यांनी व हातांनी किती हस्तलिखिते, किती पोथ्या, किती जुनी कागदपत्रे, किती दुर्मीळ ठांथ हाताळले होते, पाहिले होते, आत्मसात केले होते! ते हात कधी माझ्या हातांत आले, कधी पाठीवर पडले, कधी डोक्यावर... यापेक्षा मला अधिक तरी आणखी काय हवे होते?

अण्णांना मी कधी विनोदाने म्हणत असे, "अण्णा, तुम्ही इतके फिरलात; महाराष्ट्रात, महाराष्ट्राबाहेर यातून कमीत कमी एक लाल एसटी विकत घेता आली असती." याला ते मनापासून हसून मूक दाद द्यायचे. एवढ्या प्रचंड प्रवासाचे प्रवासवर्णन त्यांनी लिहिले असते तर उत्तम प्रवासवर्णन कसे लिहावे हे आपल्याला समजले असते, पण हा साधा, चैनीचा प्रवास नव्हता, खडतर होता. आणि त्याचे उद्दिष्ट तर स्पष्ट होते, ते म्हणजे ज्ञानसाधना. संशोधकाला करावे लागणारे क्षेत्रीय कार्य त्यात अभिप्रेत होते. हे क्षेत्रीय कार्य सफल झाले की त्यांना हे श्रम कारणी लागल्याचा आनंद होई. कधी हा शोध अपूर्ण राहिला तर ते थोडे अस्वस्थही होत.

देव-दैवतांचा शोध घेणारे अण्णा, मोठा प्रवास करून आल्यावर आपल्याला अमुक ठिकाणी देवदर्शन कसे झाले, हा प्रसाद आणला आहे किंवा आपण तेथे पूजाअर्चा केली असे कधीही सांगत नसत. कारण त्यांना त्यात यत्किंचितही रस नव्हता. तिथे कोणती कागदपत्रे, पोथ्या वा हस्तलिखिते मिळाली किंवा कोणते ग्रंथ खरेदी केले हे त्यांच्यासाठी महत्त्वाचे होते.

अण्णांच्या व्यक्तिमत्त्वात एक सभ्यता होती आणि ही सभ्यता त्यांच्या संशोधनातही दिसून येते. सभ्यतेच्या भूतकालीन व समकालीन सांस्कृतिक आढाव्याचे बौद्धिक स्वरूप त्यांच्या संशोधनात दिसते. त्यांच्याशी बोलताना जाणवायचे, की हा संवाद म्हणजे वर्तमान आणि भूतकाळ यांच्या दरम्यान त्यांचा चाललेला व्यक्तिगत संवादच आपण ऐकत आहोत. आणि मग तो संवाद म्हणजेच एक इतिहास असतो. इतिहास- समाजाचा, धर्मशास्त्राचा, पुराणांचा, मानवसमूहाच्या प्रगती-अवनीतीचाही. पण अण्णांच्या अभ्यासाचे स्वरूपही काहीसे वेगळे होते. ते वेगळेपण येथे अधोरेखित केले पाहिजे. अण्णांचे वेगळेपण हे होते, की मानवसमूहाच्या प्रदीर्घ कालपटात मानवी संस्कृतीचा अभ्यास करताना देव, देवता, पंचमहाभूते, अरण्ये, प्राणी, महाकाव्ये अभ्यासतानाच ज्यांना पददलित ठेवण्याचा प्रयत्न केला, त्या पददलितांच्या संस्कृतीचा अभ्यास केल्याशिवाय अभिजनांच्या संस्कृतीचा करता येणार नाही, ही त्यांची भूमिका होती. पददलितांच्या संस्कृतीला प्रतिष्ठा देण्याची त्यांची भूमिका महत्त्वाची मानावी लागेल. त्यांच्या संशोधनप्रतिभेचे हेच वेगळेपण आहे.

आयुष्यभर धर्मेतिहासशास्त्र आणि धर्माचे समाजशास्त्र या दोन्ही अध्ययनपद्धतींचा संबंध उलगडण्यासाठी अभ्यास करणारे अण्णा धर्मांध नव्हते. देव-दैवतांच्या संकल्पनांचा, परंपरांचा, रितिरिवाजांचा शोध घेणारे अण्णा व्यक्तिगत जीवनात पूजाअर्चा अथवा कर्मकांडापासून दूर राहिले. त्यांनी स्पष्ट म्हटले आहे- 'मी सश्रद्ध माणूस आहे. श्रद्धेचं सामर्थ्य जाणणारा माणूस आहे. पण रूढ कर्मकांडापलीकडे जाण्याचा आणि 'कर्माचे डोळे ज्ञान, ते चोख होआवे' या ज्ञानदेवांच्या इशाऱ्याला सजगपणे स्वीकारत पुढे जाण्याचा प्रयत्न मी

आयुष्यभर करत आलो आहे.'

अण्णांची ही संशोधनयात्रा खडतर आणि संघर्षमय आहे. त्यांचे आयुष्यही तसेच होते, अर्थात एका बाजूने अण्णा नशीबवानही होते. अण्णांना म. म. पोतदार, पं. महादेवशास्त्री जोशी, विद्यानिधी सिद्धेश्वरशास्त्री चित्राव, वि. भि. कोलते अशा विद्वानांशी चर्चा करण्याचे भाग्य मिळाले. 'लोकसंस्कृतीचे प्रातिभ दर्शन' (संपादन : डॉ. अरुणा ढेरे, वर्षा गजेंद्रगडकर, पद्मगंधा प्रकाशन, पुणे, २०००) हा ग्रंथ पाहिला तर अण्णांच्या कामाची मौलिकता त्यांच्या समकालीन पण महत्त्वाच्या अधिकारी व्यक्तींनी स्पष्ट केली आहे. ह्यात लक्ष्मणशास्त्री जोशी, नरहर कुरुंदकर, ग. त्र्यं. माडखोलकर, स. रा. गाडगीळ, पु. ल. देशपांडे, प्र. के. अत्रे, शं. गो. तुळपुळे, म. के. ढवळीकर अशा अनेक विचारवंतांनी अण्णांच्या कामाची चिकित्सा केली आहे.

संशोधनकार्यात आपल्या व्यक्तिगत जीवनातली श्रद्धा, संवेदनशीलता, वेळप्रसंगी आलेले नैराश्य यांना त्यांनी दूर ठेवले. संशोधकाकडे आवश्यक असणारी तटस्थता व नीर-क्षीर विवेकबुद्धी यांपासून ते कधी विचलित झाले नाहीत.

अलीकडे बोलताना मात्र ते पटकन हळवे होत. करुणेने त्यांचे डोळे डबडबले जात होते. लिहितानाही कधी कधी संशोधकावर त्यांचे माणूसपण प्रभाव टाकत आहे हे लक्षात येत होते. एकटाकी, खाडाखोड नसलेले शुद्ध, स्वच्छ लेख हेच तर अण्णांचे वैशिष्ट्य. पण अलीकडे लिहिताना त्यांचा हात थरथरत असावा. 'नरसिंहावर'च्या लेखात ते लक्षात येत होते. वीस पुस्तके प्रकाशित करताना कधीही अशी अडचण आली नव्हती, ती ह्या शेवटच्या पुस्तकात प्रथमच जाणवली. त्यातलेच काही शब्द व शंका विचारण्यासाठी मी आदल्या दिवशी संध्याकाळी अण्णांकडे गेलो होतो. स्मरणशक्तीला मात्र यत्किंचितही धक्का लागला नव्हता. त्यामुळे अण्णांनी स्मरणशक्तीच्या आधारे पटकन शंका दूर केल्या. रात्री ८.३०पर्यंत त्यांच्याबरोबर होतो. आणि फक्त रात्र उलटली आणि पहाटेच फोन आला- अण्णा गेले.

आता 'श्रीनरसिंहोपासना : उदय आणि विकास' हे पुस्तक अण्णा गेल्यावर प्रकाशित होत आहे. या पुस्तकाची प्रत त्यांना प्रत्यक्ष हातात देता येणार नाही, याची हळहळ कायमच मनात राहील.

एखाद्या संशोधन ग्रंथाचे उत्तम स्क्रिप्ट कसे बनवावे हे मी अण्णांकडूनच शिकलो. ग्रंथ निर्माण करणे हे जितक अवघड काम आहे, तितकेच तो प्रकाशित करणे. टीपा, तळटीपा, नामसूची, ग्रंथसूची अशी ग्रंथांची विविधांगे नीट साकारली तरच तो ग्रंथ सिद्ध झाला म्हणता येईल. प्रकृतीची साथ नसल्यामुळे अण्णांना काही ग्रंथांच्या शेवटी काही सूचिपत्रे तयार करता आली नाहीत, याची खंत असे.

संशोधनपर ग्रंथाचा वाचकवर्गही बौद्धिक स्तर वरचा असलेला असतो. सर्वसाधारणपणे संशोधकांच्या पुस्तकांना फारशी लोकप्रियता नसते; पण अण्णांच्या अनेक ग्रंथांच्या आवृत्त्या निघाल्या. महाराष्ट्रातील जाणकार वाचकांनी त्यांच्यावर भरभरून प्रेम केले. लौकिक जीवनात त्यांना आणखी सन्मान मिळायला हवे होते, शासन किंवा इतर संस्थांनी त्यांना 'पद्मश्री' देऊन सन्मानित करायला हवे होते, अशा प्रतिक्रिया आज अनेकजण देत आहेत. जे मिळाले नाही त्याची आता चर्चा नको, पण माझी सर्वांनाच विनंती आहे, की त्यांना 'महाराष्ट्राचे थोर संशोधक' असे न म्हणता 'भारताचे थोर संशोधक' असे म्हटले तर त्यांचा योग्य सन्मान होईल. अण्णांनी महाराष्ट्राबाहेरही क्षेत्रीय कार्य केले आहे. आणि आज त्यांचे अकरा ग्रंथ कन्नडमध्ये तर दोन ग्रंथ इंग्रजीत अनुवादित झाले आहेत. जर्मनी व इतर परदेशी विद्यापीठांतून अण्णांच्या संशोधनाच्या आधारे पुढे संशोधनकार्य चालू आहे. जर्मनी, अमेरिका वगैरे राष्ट्रांत त्यांना मानणारे स्कॉलर्स आहेत. त्यात डॉ. गुंथर डी. सॉन्थायमर, ॲन फेल्डहाउससारखी नावे पटकन सांगता येतील.

सध्या मिथकांची व भारतीय देव-दैवतांच्या मिथकांच्या आधारे सर्वसाधारण दर्जाची पुस्तके बाजारात लाखोंनी विकली जात आहेत. पण मायथॉलॉजी किंवा मिथकांचा अभ्यासाचा प्रारंभ अण्णांनी साठ वर्षांपूर्वीच केला. 'देवताविज्ञान' ही ज्ञानशाखा अण्णांनी प्रतिष्ठित केली.

आपल्या आयुष्याचा हेतू आणि पुढील कार्याची दिशा अण्णांनी अगदी कोवळ्या वयातच निश्चित केली. कोणी वेडेही म्हटले असेल. पण एकदा आयुष्यात ठरवलेली गोष्ट तपस्या समजून ते शेवटपर्यंत त्या भूमिकेपासून विचलित झाले नाहीत. अडचणी आल्या, संकटे आली, वाङ्मयबाह्य वाद झाले, पण आपल्या ज्ञाननिष्ठेशी ते प्रामाणिक राहिले. यातूनच ते ज्ञानर्षी झाले, युगप्रवर्तक झाले. खऱ्या अर्थाने ते राजवाडे, कोसंबी व केतकरांचे वारस ठरले.

आज अण्णा नसले तरी त्यांनी ठेवलेल्या ज्ञानाच्या खुणा जपून ठेवल्या आहेत. त्याच्या साक्षीनेच पुढील वाटचाल करणे हीच त्यांना खरी श्रद्धांजली ठरेल.

◆

**अरुण जाखडे**
arunjakhade@padmagandha.com



अनुक्रमणिका





लेख

वर्षा गजेंद्रगडकर

# ज्ञानोपासकाच्या समृद्ध सहवासात



**अण्णांच्या विद्वत्तेच्या मुळाशी जशी त्यांची तीव्र ज्ञानलालसा होती, तसंच त्यांच्यामधलं सहृदय आणि तत्वनिष्ठ माणूसपणही होतं. त्यामुळेच अण्णांची विद्वत्ता त्यांच्या व्यक्तिमत्त्वाला रूक्ष करकरीतपणाचा स्पर्श करू शकली नाही. उलट, त्यांच्या संवेदनशील कविमनाने आणि त्यांच्या सहृदय वृत्तीने या विद्वत्तेलाच माणुसकीची, समजुतीची आणि स्वतःला इतरांशी जोडणाऱ्या असोशीची सोबत दिली. केवळ कागदपत्रांच्या किंवा शिलालेखादी पुराव्यांच्या आधारावर विसंबून न राहता या पुराव्यांना मानवी मनोव्यापाराची जोड देत भारतीय संस्कृतीतल्या अनेक गुंतागुंतीच्या कोड्यांची उकल अण्णा करू शकले ते यामुळे.**





अण्णा गेल्यावर त्यांच्याविषयी पुनःपुन्हा लिहायची वेळ येते आहे आणि दरवेळी मागे वळून पाहताना अण्णांसारखे वडील मिळाल्याचा आनंद आणि अण्णा सोबत नसल्याचं दुःख यांचं विलक्षण रसायन मनाचा तळ ढवळून काढतं आहे.

ज्ञानलालसेने अखंड धगधगणारा विद्वान संशोधक आणि अतिशय संवेदनशील आणि प्रेमळ वडील अशा दोन्ही रूपांतले अण्णा मी भरभरून अनुभवले. खरं तर अण्णांची ही दोन्ही रूपं भिन्न नव्हतीच. अनेकदा संशोधक, कलावंत, विद्वान व्यक्ती समाजासाठी, सामाजिक क्षेत्रासाठी किंवा ज्ञानाच्या-विद्येच्या विश्वासाठी जितक्या लाभदायी ठरतात, तितक्या त्या घरापासून, कुटुंबापासून तुटल्यासारख्या होतात. अण्णा मात्र याला पूर्ण अपवाद होते. याचं कारण, मला वाटतं, अण्णांच्या विद्वत्तेच्या मुळाशी जशी त्यांची तीव्र ज्ञानलालसा होती, तसंच त्यांच्यामधलं सहृदय आणि तत्वनिष्ठ माणूसपणही होतं. त्यामुळेच अण्णांची विद्वत्ता त्यांच्या व्यक्तिमत्त्वाला रूक्ष करकरीतपणाचा स्पर्श करू शकली नाही. उलट, त्यांच्या संवेदनशील कविमनाने आणि त्यांच्या सहृदय वृत्तीने या विद्वत्तेलाच माणुसकीची, समजुतीची आणि स्वतःला इतरांशी जोडणाऱ्या असोशीची सोबत दिली. केवळ कागदपत्रांच्या किंवा शिलालेखादी पुराव्यांच्या आधारावर विसंबून न राहता या पुराव्यांना मानवी मनोव्यापाराची जोड देत भारतीय संस्कृतीतल्या अनेक गुंतागुंतीच्या कोड्यांची उकल अण्णा करू शकले ते यामुळे. अर्थात, कोणत्याही भावनेच्या किंवा क्षणिक ऊर्मीच्या आवेगात अण्णांनी समोर दिसणाऱ्या सत्याकडे कानाडोळा केला नाही. उलट, स्वतःला, हातात आलेल्या साधनांना पुन्हा पुन्हा तपासून पाहत सत्याचा अस्सलपणा ते सतत जोखत राहिले. अण्णांमधला माणूस त्यांच्यामधल्या संशोधकाच्या पाठीशी असा सतत उभा असल्यामुळेच साठ-पासष्ट वर्षं झपाटल्यासारखं अखंड संशोधन करत असतानाही अण्णा घरापासून, आम्हा मुलांपासून दूर गेले नाहीत, अलिप्त राहिले नाहीत.

हातात आलेल्या दुव्यांची जुळवाजुळव ते तहानभूक विसरून तळमळीने



अनुक्रमणिका






करत राहिले, तसंच संशोधनातून पुढे आलेल्या अपूर्व निष्कर्षांबद्दल मंत्रभारलेल्या अवस्थेत आमच्याशी नेहमी बोलतही राहिले. संशोधनाचा एखादा लहानसा विषय कसा सुचला याविषयी ते भरभरून सांगायचे, कुठल्या तरी आडगावात जाऊन पुरावा शोधण्यासाठी करावा लागलेला आटापिटा सगळा त्रास विसरून सांगायचे, अर्धी निद्रा-अर्धजागृती अशा अवस्थेत झालेल्या सत्याच्या अकल्पित उलगड्याविषयी विलक्षण आनंदाने बोलायचे आणि अण्णांच्या तोंडून या गोष्टी ऐकताना आमची अवस्थाही मंत्रभारली होऊन जायची. शाळा-कॉलेजच्या वयात त्यांच्या संशोधनविषयांचं मर्म नेमकं कळायचं नाही, पण अण्णांची तल्लीनता, त्यांचं झपाटलेपण आणि अर्जुनाच्या एकाग्रतेने त्यांनी घेतलेला सत्याचा वेध आतपर्यंत झिरपत जायचा, आणि म्हणूनच कुठल्याही खाऊ-खेळण्यापेक्षा अण्णांचं बोलणं ऐकणं, घरी येणाऱ्या अनेकानेक विद्वानांसोबतच्या त्यांच्या गप्पा ऐकणं ही आम्हा भावंडांसाठी फार मोठा आनंद देणारी गोष्ट होती.

ज्या घराच्या भिंतीच पुस्तकांच्या होत्या अशा घरात लहानाचं मोठं होताना आम्ही पुस्तकी किडे झालो नाही याचं श्रेयही अण्णांनाच द्यायला हवं. कारण अण्णांनी आम्हाला भोवतीच्या जगाकडे आणि माणसांकडे 'आतले डोळे' उघडून पाहायला शिकवलं. सूर्योदयापूर्वीचं उजळ लालसर आकाश असो, एखाद्या गूढाकडे जावं तसं रस्त्याचं लहानसं पण सुंदर वळण असो, सकाळी दारात येणारा वासुदेव किंवा पिंगळा असो, वेगळ्या वाटणाऱ्या आडनावामागचा इतिहास असो किंवा कुठल्या तरी आडगावात दुर्लक्षित अवस्थेत उभ्या असलेल्या मंदिराशी निगडित कथा असो- अशा अनेक गोष्टींपर्यंत माणूसपणाचे पूल उभारून पोहोचण्याचं कौशल्य आणि बळ आम्हाला अण्णांनी दिलं. आयुष्यात सहज सामोऱ्या येणाऱ्या आणि तरीही इतरांच्या वाट्याला न येणाऱ्या अशा किती तरी गोष्टी ओंजळीत जमवत आम्ही भावंडं वाढत गेलो.

अण्णांनी जमा केलेला पुस्तकांचा खजिना सगळाच्या सगळा वाचून काढणं ही एक अण्णा सोडले तर इतरांसाठी अशक्य कोटीतली गोष्ट होती. पण अण्णांच्या या खजिन्यात काय नाही? संशोधनासाठीच्या संदर्भांखेरीज आणि प्राचीन मराठी वाङ्मयाखेरीज किती तरी प्रकारची पुस्तकं अण्णांनी जमवली, आम्हाला वाचायला दिली. त्यात उत्तम इंग्रजी साहित्य आहे; इंग्रजी, हिंदी, बंगाली भाषेतल्या अभिजात साहित्यकृतींचे अनुवाद आहेत, मराठी कथा-कविता-कादंबरी-समीक्षा आहे, चरित्रं-आत्मचरित्रं आहेत आणि अप्रतिम प्रवासवर्णनंही आहेत. ही पुस्तकं आम्ही अधाशासारखी वाचत आलो. या वाचनासोबत अण्णांच्या आई-आत्याशी आणि मित्रमंडळींशी चाललेल्या गप्पांमधूनही आम्हाला पुष्कळ मिळत-समजत गेलं. संशोधन साधनं मिळवण्यासाठीची अण्णांची चिवट जिद्द आम्ही पहिली, अडचणीच्या वेळी मित्रांच्या मदतीला रात्री-अपरात्री धावून जाणारे अण्णा आम्ही पाहिले, एखाद्या चित्रपटातला माणुसकीचा गहिवर असलेला प्रसंग पाहताना डोळ्यांतून घळाघळा वाहणारे त्यांचे अश्रू आम्ही पाहिले, आमच्या अगदी लहानशा यशानेही आनंदून जाऊन पेढे आणायला धावणारे अण्णा आम्ही पाहिले आणि नैतिकतेचा बुरखा पांघरून सांस्कृतिक जीवन प्रदूषित करू पाहणाऱ्यांना परखड भाषेत समज देणारे अण्णाही आम्ही पाहिले. एरवी अतिशय सौम्य, मृदू आणि सोशिक असणाऱ्या अण्णांना तत्त्वाचा आणि अस्तित्वाचा प्रश्न पुढे आला की विजेप्रमाणे तळपताना आम्ही पाहिलं आहे. प्रसंगी अनेकांचा रोष पत्करून अण्णांनी एकाकीपणाने सत्य आणि नैतिकतेला नेहमीच उराशी धरलं. वाङ्मयबाह्य घटक सक्रिय होऊन ज्ञानाच्या, साहित्याच्या प्रवाहाला गढूळ करताहेत, प्रवाहात अडसर निर्माण करताहेत, ही बाब अण्णांसाठी नेहमीच फार फार क्लेशकारक होती. पण आपली ऊर्जा अशा रुणाईत व्यक्तींशी लढण्यात घालवण्यापेक्षा अण्णा त्या गोष्टींकडे दुर्लक्ष करून आपल्या कामात बुडून जायचे. ज्ञानसाधना हा अण्णांचा जीवनरस होता आणि सगळ्या भौतिक-लौकिक त्रासांवरचा तो रामबाण उपायही होता.

अण्णांच्या आयुष्याचा मोठा भाग आर्थिक प्रतिकूलतेत गेला, पण या दुःख-दैन्याचं त्यांनी कधी भांडवल केलं नाही. खरं तर या परिस्थितीचा नुसता उच्चारही त्यांनी केला नाही. शिवाय, सगळ्या प्रकारच्या प्रतिकूलतेला तोंड देताना अण्णांचा स्वाभिमान कधी उणावला नाही आणि थोडंसं स्थैर्य आल्यावर पूर्वी मिळालेल्या लहानशा आधाराचा त्यांना कधी विसर पडला नाही. संशोधनासाठी अण्णा देशात खूप ठिकाणी फिरले. अनेक वर्षं ही संशोधनयात्रा फार खडतर होती. खिशात पैसे नाहीत, संपर्काची आणि दळणवळणाची पुरेशी साधनं नाहीत, असा तो काळ होता. एखाद्या धर्मशाळेत किंवा एस.टी. स्टँडवर रात्र काढून, अनेकदा उपाशी राहून अण्णा प्रवास करायचे. सोबत कुणी तरी मित्र असायचा. काही वेळा कच्च्या रस्त्यांवरून आडगावात मित्राच्या दुचाकीवरूनही ते जायचे. हाडं खिळखिळी करणारे रस्ते, ऊन-पावसापासून संरक्षण नाही; पण या सगळ्या त्रासाला तोंड देताना त्यांना त्यांचं उद्दिष्ट खुणावत असायचं आणि हवी असलेली एखादी हस्तलिखित पोथी, एखादं स्थळमाहात्म्य, नेमकी माहिती देणारी एखादी व्यक्ती किंवा एखादा

शिलालेखातला पुरावा मिळाला की अण्णा आधीचा सगळा त्रास विसरून जायचे. खरं तर त्यांच्या प्रवासातले अडथळ्यांचे किस्से नंतर कधी तरी त्या मित्रांच्या गप्पांमधूनच आम्हाला कळायचे. या सगळ्या अवघड संशोधन प्रवासातही अण्णा प्रत्येक लहानसहान मदतीची नोंद करून ठेवायचे. कुणी प्रत्यक्ष हातात दिलेलं साधन, कुणी तोंडी दिलेली माहिती, कुणी एखाद्या ठिकाणाचा दिलेला पत्ता, कुणी आपल्याजवळचा दिलेला महत्त्वाचा फोटो, किंवा एखाद्या दुर्मिळ कागदपत्राची झेरॉक्स काढण्यासाठी कुणी तरी केलेली मदत याच्या व्यवस्थित नोंदी पुढे त्या त्या पुस्तकाच्या ऋणनिर्देशात उतरायच्या.

अण्णांच्या एकूण स्वभावातच शिस्त होती. पाठकोऱ्या कागदांवर अण्णा बहुतेक लिखाण करायचे. रद्दीच्या दुकानातून पाठकोऱ्या पण आकाराने एकसारख्या कागदांचे गठ्ठे त्यांना पुष्कळ वेळा मिळायचे. अक्षर सुरेख, वळणदार आणि एकसारखं. बिनरेघांच्या कागदावरही सरळ रेषेत लेखन. खाडाखोड जवळजवळ नाहीच. सगळं लेखन एकटाकी. संदर्भटीपा लिहिण्यासाठी निमंत्रणपत्रिका किंवा वाया गेलेल्या फोटोंची एकसारखी कार्ड्स कापून ठेवायचे अण्णा. इप्रिंट पेजपासून सगळ्या तांत्रिक बाबींकडे त्यांचं लक्ष असायचं. प्रत्येक पुस्तकाची प्रेसकॉपी एका पिशवीत व्यवस्थित घालून प्रकाशकांकडे सोपवायचे. प्रूफ्स तर ते फार बारकाईने वाचायचे. एखादी किरकोळ चूकही राहू नये याकडे त्यांचं लक्ष असायचं. तरीही पुस्तक प्रसिद्ध झाल्यावर परत एकदा ते शुद्धलेखनाच्या दृष्टीने पुस्तक वाचायचे. चूक दिसली तर पेन्सिलनं दुरुस्त करायचे. इतरांची पुस्तकं वाचतानाही अण्णा फार सतर्क असायचे. संग्रहातल्या अनेक पुस्तकांवर अण्णांनीं पेन्सिलने केलेल्या दुरुस्त्या दिसताहेत. आणि संदर्भांच्या पानांवर त्यांनी खुणाही घालून ठेवलेल्या आहेत.

नेहमीच्या संपर्कातल्या अभ्यासकांचे पत्ते आणि फोन नंबर अण्णा डायरीत एकाखाली एक लिहून ठेवायचे. पोस्टाची तिकिटं, रेव्हेन्यू स्टँप्स, इनलँड पत्रं, पोस्टकार्ड्स त्यांच्या टेबलाच्या खणात कायम असायची. अण्णा अनेकांना नियमित पत्रं लिहायचे, त्यामुळे साहजिकच त्यांच्या उत्तरांची वाट ते पाहायचे. त्यामुळे दररोज पोस्टमनच्या वेळांवर अण्णांचं लक्ष असायचं. एखादा दिवस तो आला नाही तर अण्णा अस्वस्थ व्हायचे. दुसरा दिवस कसाबसा काढून तिसऱ्या दिवशी ते जवळच्या पोस्ट ऑफिसमध्ये जाऊन पत्रं आली आहेत की नाही याची खात्री करायचे. पोस्टमन आजारी पडणं, त्याच्याकडे काही अडचण असणं अशा शक्यतांखेरीज पत्रं न येण्याचा प्रश्न उद्भवणार नाही याची अण्णांना खात्री असायची. डाक निघायच्या आत आपलं पत्र पोस्टात पडेल (म्हणजेच ते लवकरात लवकर पोचेल) यावर अण्णांचा फार कटाक्ष असायचा. फोन आणि विजेची बिलंसुद्धा कागदी पिशवीत घालून, क्रमाने लावून ठेवायची सवय अण्णांना होती.

इतक्या छोट्या गोष्टींत असणारी शिस्त अण्णांच्या कामात तर कायम आणि फार काटेकोर असायची. संशोधनासाठी अमुक अमुक ठिकाणी जायला लागेल, असं त्यांनी सांगितल्यावर आम्ही प्रवासाचं नियोजन सुरू करायचो, आणि निघण्यापूर्वी आवश्यक असा टेबल रिसर्च पूर्ण करण्याच्या मागे अण्णा लागायचे. कमीत कमी दिवसांत कुठल्या मार्गाने कुठे कुठे जाता येईल, काय काय पाहता येईल, कुठली साधनं/पुस्तकं कुठे मिळू शकतील, कुणाच्या भेटी घेता येतील याचा आराखडाही अण्णा तयार करायचे. त्या त्या भागातल्या संबंधित संस्था, व्यक्ती, ग्रंथालयं, पुस्तकांची दुकानं यांचे पत्ते त्यांच्या प्रवासाच्या डायरीत लिहून तयार असायचे. तब्येत बरी नसली तरी संशोधनाला जायचं म्हटल्यावर अण्णांचा उत्साह नेहमीच वाढायचा. कामावरची अफाट निष्ठा आणि ध्यास यांच्या जोरावरच तर अण्णांनी व्यंकटेश आणि नरसिंहाविषयीच्या प्रकल्पांचे प्रवास केले. एरवी मुळातच नाजूक असलेली तब्येत आणि ८२-८३ वर्षांचं वय बघता केरळ, कर्नाटक, आंध्र, तामिळनाडू आणि ओरिसा असे लांबचे प्रवास कुणालाच झेपले नसते. अगदी डिसेंबर २०१३ पर्यंत अण्णा संशोधनासाठी असे प्रवास करत होते. नरसिंहावरच्या पुस्तकासाठी त्यांनी ओरिसाचा केलेला दौरा हा त्यांचा अखेरचा दौरा.

त्याआधी त्याच वर्षी ते हंपीला गेले होते. हंपीच्या आसपासची बरीच ठिकाणं त्यांना पाहायची होती आणि हंपी विद्यापीठात काही पुस्तकं मिळाली तर हवी होती. ताई आणि ऋत्विक (नातू) अण्णांबरोबर होते तेव्हा. हिवाळ्याचेच दिवस होते. पण नेमकं अवकाळी पावसाने त्या भागाला दोन दिवस चांगलंच झोडपलं होतं. अण्णांच्या सवयीनुसार छत्री बरोबर होती, पण पावसाचा जोर प्रचंड होता. तरीही हॉटेलमध्ये बसून न राहता अण्णांनी सगळी ठिकाणं बघितली आणि त्यांच्या सुदैवाने पावसानंही आपला वेग थांबवून हवे ते फोटो घेण्यासाठी त्यांना मुभा दिली. या प्रवासात शेवटचं काम होतं ते हंपी विद्यापीठातून काही पुस्तकं मिळवण्याचं. तोवर मात्र अण्णा चांगलेच थकले होते. त्यामुळे विद्यापीठाबाहेर गाडीतच अण्णा थांबले आणि पुस्तकांची यादी घेऊन ताई विद्यापीठाच्या प्रकाशन विभागात गेली. यादीतली बरीच पुस्तकं मिळाली, पण एक पुस्तक मात्र विक्रीला उपलब्ध नव्हतं. ते ग्रंथालयात होतं आणि त्याची झेरॉक्स मिळवावी लागणार होती. ताईने ग्रंथपालांना त्याबाबत विचारलं आणि

त्यांनी सहज कुठून आलात याची चौकशी केली. ताईने महाराष्ट्र आणि ढेरे या नावांचा उल्लेख करताक्षणी ग्रंथपाल चकित झाले. कारण हंपी विद्यापीठाने अण्णांच्या बऱ्याच पुस्तकांचा कानडीत अनुवाद केल्याचं त्यांना अर्थातच माहीत होतं. ते नितांत आदराने अण्णांविषयी बोलताहेत, हे ऐकल्यावर ताईने अण्णा बाहेर गाडीत बसले असल्याचं सांगितलं. ते ऐकताक्षणी ग्रंथपालाने कुलगुरूंकडे निरोप पाठवला आणि डॉ. ढेरे आले असल्याचं त्यांना कळवलं. पुढच्या अर्ध्या तासात कुलगुरूंनी सगळ्या विभागप्रमुखांना बोलावून अण्णांचा मोठा सत्कार केला. पण अण्णा हा सगळा वेळ अस्वस्थ होते. आमच्या दोन प्राध्यापकांना तुमच्या सोबत देतो, तुम्ही चांगल्या ठिकाणी जेवण करून या. तोवर तुम्हाला हव्या असलेल्या पुस्तकाची झेरॉक्स काढून ठेवतो, असं कुलगुरूंनी सांगितलं. पण अण्णांसाठी जेवणापेक्षा पुस्तक हातात मिळणं महत्वाचं होतं. सत्कार आणि जेवणात वेळ गेल्यामुळे पुस्तक हाती यायला वेळ लागला, म्हणून ते थोडेसे खंतावलेच होते. शेवटी झेरॉक्स पुस्तक मिळालं आणि सत्काराच्या वेळी अवघडलेल्या अण्णांच्या चेहऱ्यावर विलक्षण आनंद फुलला.

असे आनंद आम्ही घरच्या सगळ्यांनी अनेकदा पाहिले-अनुभवले आहेत. आता अण्णा नाहीत, त्यांच्या सोबतचे प्रवास नाहीत आणि असे दुर्मिळ आनंदाचे क्षण नाहीत. पण जाणत्या चाळीसेक वर्षांत अशा ज्ञानोपासक वडिलांचा जो समृद्ध सहवास मिळाला त्याचं मोल कुठल्या शब्दांत सांगणार? अण्णांची लेक असल्याचं भाग्यच त्यांच्या विरहाच्या दुःखावर मात करण्याचं बळ देईल बहुधा.

◆

**वर्षा गजेंद्रगडकर**
प्रमोदिनी, फ्लॅट नं. २, २९, ईशदान सोसायटी,
ऑफ पौड रोड, कोथरूड, पुणे ४११०३८
चलभाष : ९८२२० ५६१२४

---

# 'मसाप'ची तरुणाईला साद

## युवा मराठी ई-कथास्पर्धा २०१६ चे आयोजन
## डेलीहंट आणि 'अक्षरधारा'चे विशेष सहकार्य

सळसळत्या तरुणाईच्या सर्जनशीलतेला साद घालत महाराष्ट्र साहित्य परिषदेने अक्षरधारा आणि डेलीहंट यांच्या सहयोगाने महाविद्यालयीन विद्यार्थ्यांसाठी युवा मराठी ई-कथास्पर्धेचे आयोजन केले आहे. ही स्पर्धा तंत्रज्ञानाच्या दृष्टीनेही वैशिष्ट्यपूर्ण असणार आहे. भारतीय भाषांमधील मोबाइल ई-बुक वितरित आणि प्रकाशित करणारे 'डलीहंट' या कथा महोत्सवाला तांत्रिक आधार देत ती जगभर पोचविणार आहेत. या स्पर्धेसाठीची पारितोषिके अक्षरधारा बुक गॅलरीच्या वतीने देण्यात येणार आहेत. या स्पर्धेची माहिती www. masapapune.org या संकेतस्थळावर उपलब्ध आहे. ही स्पर्धा केवळ महाविद्यालयीन विद्यार्थ्यांसाठी असून त्यासाठी कोणतेही शुल्क नाही. कथेला विषयाचे बंधन नाही. शब्दमर्यादा १००० ते ३००० शब्दांची आहे. कथा मराठी युनिकोड फॉन्टमध्ये टाइप करून masaparishad@gmail.com या ई-मेल पत्त्यावर पाठवायची आहे. फक्त ई-मेलद्वारा येणाऱ्या कथाच स्पर्धेसाठी ग्राह्य धरण्यात येणार आहेत. स्पर्धकांनी कथेसोबत संपूर्ण माहिती आणि महाविद्यालयीन ओळखपत्राची फोटोकॉपी पाठविणे जरुरीचे आहे. स्पर्धेसाठी अप्रकाशित कथा पाठवायची असून अनुवादित कथा स्वीकारल्या जाणार नाहीत. विजेत्या तीन कथांना अनुक्रमे रु. ७०००/-, रु. ५०००/-, रु. ३०००/- पारितोषिके अक्षरधाराच्या वतीने देण्यात येणार आहेत. सर्वोत्तम ११ कथांचे ई-बुक मसाप आणि डेलीहंटच्या वतीने प्रकाशित करण्यात येणार आहे. अधिकाधिक महाविद्यालयीन विद्यार्थ्यांनी या कथास्पर्धेत सहभागी व्हावे, असे आवाहन मसापचे कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी, प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे, कोषाध्यक्ष सुनीताराजे पवार, डेलीहंटच्या अंजली देशमुख आणि 'अक्षरधारा'चे रमेश राठिवडेकर यांनी केले आहे.



अनुक्रमणिका








लेख

प्रा. डॉ. बाळासाहेब बळे

# उपासकांचे उपासक : अण्णा



लोकजीवानातून लोकसंस्कृती आणि सर्वच ज्ञानशाखा विकसित होतात. या विविध ज्ञानशाखांमधील संशोधनासाठी समाज अभ्यास आवश्यक ठरतो. प्रत्येक समाजजीवनाचा अभ्यास म्हणजे जन्मापासून मृत्यूपर्यंतच्या त्या त्या समाजातील रूढी, परंपरा, जीवनसरणी, साधने, देव-देवता, धर्मविधी, कुळाचार समजावून घेणे होय. अण्णांनी कसल्याच सवंग लोकप्रियतेच्या वाटेला न जाता, कोणा व्यक्तीच्या अगर दुराग्रही विचाराच्या अधीन न होता विवेकीवृत्तीने अण्णांनी अखंड आयुष्य लोकसंस्कृतीच्या संशोधनासाठी वेचले संशोधकांना लोकसाहित्य अभ्यासाची नवी नवी दालने आपल्या संशोधनातून खुली केली.





जीवनव्याप्त लोकसाहित्याचे गाढे संशोधक, प्राच्य विद्या विशारद, संत साहित्याचे व्यासंगी संशोधक रामचंद्र चिंतामण ढेरे ऊर्फ अण्णा सर्वार्थाने लौकिकापासून आणि सवंग लोकप्रियतेपासून अलिप्त राहिले. तटस्थ, व्रतस्थपणे आणि विवेकी वृत्तीने संशोधन करणे हे त्यांनी जीवित कार्य मानले. विघ्नकर्त्या गणेशापासून विविध मातृकांपर्यंत, तसेच विविध संप्रदायांचा अभिनिवेशरहित मूलभूत अभ्यास त्यांनी मांडला. हिंदू-मुस्लिम ऐक्यभावाचा श्री संत शेख महंमदमहाराजांच्या साहित्याच्या आधारे धांडोळा घेतला.

सर्वांत लक्षणीय बाब म्हणजे जातिव्यवस्था क्षीण व्हावी, नष्ट व्हावी, यासाठी प्रत्येक जातीची बलस्थाने विचारात घ्यावी लागतात. प्रत्येक जातिसमाजाची जडणघडण समजावून घेण्यासाठी त्यांची लोकसंस्कृती समजावून घेणे आवश्यक असते. त्यांच्यातील जन्म-मृत्यूपर्यंतच्या रूढी, समजुती, परंपरा, देवदैवत, कुलाचार, विधी, उत्सव जगण्याची साधने आणि लोकवाङ्मय यातून आविष्कृत होणारे समाजदर्शन समजावून घ्यावे लागते. कारण या समाजाच्या साधन, वर्तन आणि शाब्द परंपरेतूनच त्यांच्या लोकसंस्कृतीचे दर्शन घडते. या सर्व घटकांचा समावेश आपण लोकसाहित्यात, लोकसंस्कृतीत करत असतो. अशा या जीवनव्याप्त लोकसाहित्यातून शास्त्र, साहित्य, कला, शिल्प विकसित होतात. प्रत्येक

समाज समजावून घेण्यासाठी अपरिहार्य असलेल्या लोकसाहित्य संशोधनाला अण्णांनी अत्युच्च स्थान दिले. एवढेच नाही, तर लोकसाहित्य अभ्यासाला विधायक आणि शास्त्रशुद्ध दिशा आणि गती मिळावी, संशोधकांकडून विपुल प्रमाणात प्रमाणित संशोधन व्हावे यासाठी अण्णांनी महाराष्ट्र लोकसाहित्य संशोधन मंडळाची स्थापना केली. लोकसाहित्य संशोधकांचा राज्यात मोठा परिवार निर्माण केला. लोकसाहित्याचे ज्येष्ठ अभ्यासक डॉ. प्रभाकर मांडे, स्व. डॉ. गंगाधर मोरजे, स्व. प्राचार्य ताराबाई परांजपे, प्राचार्य डॉ. अनिल सहस्रबुद्धे, डॉ. तारा भवाळकर, डॉ. अरुणा ढेरे, पद्मगंध प्रकाशनचे मालक अरुण जाखडे, प्रकाश खांडगे, प्राचार्य डॉ. धोंडीराम वाडकर, डॉ. माहेश्वरी गावित, डॉ. सुभाष शेकडे, डॉ. संदीप सांगळे, डॉ. नवनाथ शिंदे अशी किती तरी नावे सांगता येतील. या लोकसाहित्य संशोधन मंडळामुळेच संशोधनाचा कसलाच गंध नसलेल्या माझ्यासह अनेक नवसंशोधकांना लोकसाहित्य संशोधनाच्या दालनात प्रवेश करता आला. याच संशोधन मंडळाच्या परिषदेच्या निमित्ताने अण्णांची पहिल्यांदा झालेली भेट, त्यांचा जवळून झालेला परिचय आदिवासी, भटके, निमभटके यांच्या क्षेत्रीय अभ्यासासाठी दिशा दर्शक ठरला.

सन १९८०-८१ साली डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठात मराठी विभागात एम.फिल पदवी शिक्षण पूर्ण करत असतानाच अण्णांच्या मार्गदर्शनाखाली लोकसाहित्य संशोधन मंडळाने जुन्नर महाविद्यालयाच्या सहकार्याने लोकसाहित्य परिषदेचे आयोजन केले होते. कार्यक्रमाच्या उद्घाटक होत्या विठाबाई भाऊ मांग. तापाने फणफणलेल्या अवस्थेत व्यासपीठावर त्या बसलेल्या. कार्यक्रम उद्घाटनानंतर १०३ डिग्री ताप असताना विठाबाई उभ्या राहिल्या आणि म्हणाल्या, ''मीतमाशाच्या फडात नाचणारी बाई. चांगले, वंगाळ अनुभव पचवत इथपर्यंत आले. सभेतल्या एवढ्या मोठ्या विद्वानांनी मला एवढा मान दिला, माझा सन्मान केला. ज्या घुंगरांनी आणि नाचगाण्याने आम्हाला हिणवलं त्याच घुंगरानं आणि नाच गाण्यानं आज मला तुमच्यात बसवलं. आता अशा वेळी मी माझी कला कशी झाकून ठेवू? असं म्हणत विठाबाईंनी आपल्या नृत्याची मंत्रमुग्ध करणारी अदाकारी सादर केली. त्या वेळी अभ्यासकांना स्थितप्रज्ञ अण्णांच्या गहिवरल्या मनाचे दर्शन घडले. परिषदेच्या दुसऱ्या दिवशी 'शिवनेरी' किल्ल्यावर अण्णांसह काही जेष्ठ लोकसाहित्य अभ्यासकांच्या शोधनिबंधाचे वाचन होते. 'शिवनेरी' किल्ल्यावर जाताना अनेक अभ्यासकांनी, स्थानिकांनी शिवनेरी किल्ल्याच्या साक्षीने बाळ शिवबाच्या आठवणी जागविल्या. माझ्यासारख्या अनेकांना शिवाजीराजाचं जन्मस्थळ पहिल्याचा आनंद झाला. परिषदेत संधी मिळाली तर शोध निबंध वाच, असे डॉ. प्रभाकर मांडे यांनी सुचविल्याप्रमाणे 'लोकजीवनातील कावळा' या विषयावर तीन पानांचा शोध निबंध लिहिलेला. (शोध निबंध कसला, फक्त लोकजीवनात कावळ्याबद्दल असलेल्या समजुतीची माहिती.) परिषदेत शोधनिबंध वाचनाला सुरुवात होण्याच्या अगोदर डॉ. मांडे सरांनी अण्णांना माझं नाव सांगितलं. आष्टी तालुक्यातला शेतकरी कुटुंबातला हा मुलगा. लोकसाहित्य अभ्यासासाठी अनेक वेळा शोधयात्रेत बरोबर असतो असं सांगितलं. मी आदबीने नमस्कार करून निबंधाची तीन पानं अण्णांच्या हाती दिली. कावळा सर्व पक्ष्यांत चतुर, कावळा आपला पूर्वज, वंशज, कावळा महार, कावळा शिवणे (रजस्वला स्त्रीसंदर्भात), कावळा जुळल्याचे (प्रणयक्रीडा) पाहणे अशुभ, पिंडाला काकस्पर्श, दूर्वाचा कावळा... अशा मजकुराचा माहितीवजा असलेला निबंध अण्णांनी ओझरता पहिला आणि 'शिवनेरी'वर माझ्याऐवजी बळे हा विद्यार्थी निबंधाचे वाचन करेल असे सुचवले. अण्णांच्या या निर्णयाने मी हादरलो, भांबावून गेलो. आयुष्यात पहिल्यांदा लोकसाहित्य परिषदेत निबंध वाचण्याची संधी मिळाली. नंतर अण्णांनीच माझ्यावतीने प्रश्नांची उत्तरं देऊन लोकसाहित्याच्या मुलभूत संशोधनासाठी लोकसाहित्य संकलनाची गरज असल्याचे प्रतिपादन करून बळे या विद्यार्थ्याने त्या दृष्टीने केलेला प्रयत्न असल्याचे सांगितले. इथेच खऱ्या अर्थाने साक्ष पटली ती वरकरणी सामान्य असलेल्या असामान्य अण्णांची. त्यांच्यातील माणूसपणाची, माणुसकीची.

निबंधवाचन कार्यक्रमानंतर अण्णांनी मला जवळ बोलावून घेतले. आस्थेने कुटुंबाबाबत चौकशी केली. एम.फिल पदवीसाठी कोणता विषय निवडला, असे अण्णांनी विचारताच, मी 'पोतराजाच्या घुपारत्या' संकलित करीत असल्याचे सांगितले. त्यांनी मला 'फलटण येथील धनगरांच्या देवता धुळोबा-भिवया या विषयावर संशोधन केले तर एका नव्या विषयावर संशोधन होईल; या संशोधनातून भटके, निमभटके जीवन जगत असलेल्या धनगर समाजाचे लोकजीवन व त्यांच्या देव-देवता

प्रकाशात येतील', असे सुचविले. अण्णांची हीच सूचना प्रमाण माणून दोन वर्षं आर्थिक परिस्थितीशी सामना करत धनगरांच्या नित्य, नैमित्तिक विधीप्रसंगी म्हणण्यात येणाऱ्या कथागीतांचे व एकूणच त्यांचे साधन, वर्तन आणि शाब्द साहित्य संकलित केले. अधूनमधून अण्णांना संशोधनाची वाट पुसत डॉ. प्रभाकर मांडे ( भाऊ ) यांच्या मार्गदर्शनाखाली 'धनगरांच्या देव-देवता धुळोबा-भिवया' या विषयावर संशोधन केले. सविता प्रकाशनने प्रकाशित केलेल्या या ग्रंथाचे प्रकाशन श्रीगोंद्यातील आठव्या लोकसाहित्य परिषदेत प्राचार्या ताराबाई परांजपे यांच्या हस्ते झाले. पुस्तकाची प्रत घेऊन 'विदिशा'त अण्णांची भेट घेतली तेव्हा त्यांना खूप आनंद झाला. त्यांनी पाठीवर शाबासकी दिली. तोंड गोड केलं. त्याच्या घरी गेलेला कोणताही माणूस काही खाल्ल्याबिगर विन्मुख यायचा नाही. हे तत्त्व अण्णांनी आणि ताई, माईंसह संपूर्ण परिवाराने पुण्यात राहून जपले. अण्णांचा निरोप घेताना अण्णा म्हणाले, "थांब. मुख्य रस्त्यापर्यंत मी सोबत येतो." अण्णा माझ्यासोबत हमरस्त्यापर्यंत आले. एवढ्या मोठ्या ऋषितुल्य माणसाने आपल्यासारख्या अतिसामान्य माणसाला एवढी सन्मानाची वागणूक द्यावी हा माझ्या जीवनातील अविस्मरणीय क्षण होता. याबाबत जगावेगळ्या अण्णांचं वर्णन करायला माझ्याकडे शब्दच नाहीत. असले तरी त्यांचे मोठेपण शब्दांत न मावणारे. अण्णांच्या निधनानंतर माई, इंदुताई, अरुणाताई, वर्षाताई व अण्णांचे कुटुंबीय यांना भेटण्यासाठी घरी गेलो. अण्णांच्या आठवणींना उजाळा मिळाला. अण्णांच्या परिवाराचा निरोप घेऊन मी हमरस्त्याच्या दिशेने निघालो, त्या वेळी अण्णांचे माझ्यासोबत हमरस्त्यापर्यंत आल्याचा भास मी अनुभवत राहिलो.

अण्णांना भेट दिलेले 'धनगरांच्या देव-देवता धुळोबा-भिवया' पुस्तक त्यांनी वाचले. केसरी वर्तमानपत्रात त्यांनी प्रसिद्ध केलेल्या शिखर शिंगणापूरच्या लेखातून धुळोबा-भिवया या ग्रंथातील संशोधनावर भाष्य केले. लोककलेचे अभ्यासक प्रकाश खांडगे यांनाही अण्णांच्या कृपाशीर्वादामुळे आपल्या क्षेत्रात नावलौकिक मिळवता आला. इथे एवढे विस्ताराने सांगण्याचे तात्पर्य एवढेच, की प्रत्येक समाजाच्या लोकसंस्कृतीचा अभ्यास झाला तर या देशातील समाजजीवन कळेल. सर्व क्षेत्रातील संशोधकांना याची मदत होईल. त्यासाठी लोकसाहित्य अभ्यास पुढे जाण्याची गरज आहे. विविध समाजघटकातील नवसंशोधक हे काम करतील. नवसंशोधकाला योग्य वेळी संशोधनाची योग्य दिशा मिळाली तर चांगले संशोधन होऊ शकेल यावर अण्णांची श्रद्धा होती. त्यासाठी ते आपला संशोधनाचा पसारा बाजूला करून निगर्वीपणाने अभ्यासकांशी बोलत राहायचे, बोलता बोलता किती तरी नव्या विषयाला स्पर्श करायचे. चालत्या-बोलत्या या विद्यापीठाच्या पासंगाला उरण्याची संधी ज्यांना ज्यांना मिळाली त्यांचे जीवन उजळून निघाले.

फलटण येथील धनगर देव-देवतांच्या अभ्यासासाठी धुळोबा-भिवयाच्या यात्रेत माहिती संकलन करताना तेथील निवासी धनगर भगत माहिती देण्यास टाळाटाळ करू लागले. त्याच वेळी मातृदेवतांचा अभ्यास करणाऱ्या अमेरिकन ॲनफेल्डहाऊस याही या देवतांची माहिती संकलित करत असताना धनगर कुटुंबीयांना, भगतांना विविध प्रकारच्या भेटवस्तू, रोजगार बुडाला म्हणून काही रक्कम देत असल्याचे भगतांनी सांगितले व तीच अपेक्षा त्यांनी माझ्याकडे संकलनकामी व्यक्त केली. लोकसाहित्य संकलनातील या पायंड्याबाबत अण्णांकडे तक्रार मांडली असता त्यावर अण्णा एवढेच म्हणाले, "ॲनफेल्डहाऊस या मोठ्या संशोधिका आहेत. परदेशी संशोधक इथे येऊन संशोधन करतात. इथली लोकसंस्कृती समजावून घेतात. संशोधनाच्या दृष्टीने ही बाब महत्त्वाची आहे. पण आपली मुळे याच मातीतील असून ती या मातीतील प्रत्येक समाजापर्यंत विस्तारलेली आहेत. त्याचा शोध घेणे हे आपल्याला सहज शक्य आहे. आपल्या जीवनात, संशोधनात अशा छोट्या मोठ्या अडचणी येतच असतात. त्याबद्दल न कुरकुरता आपण आपलं काम करत राहायचं." या व अशा बोलण्यातूनच अण्णांचा स्वभाव उलगडत जायचा. अण्णांचे शहाणपण न रुचलेल्या तथाकथित लोकांनी पुण्यातील अण्णांचा दुस्वास केला, प्रसंगी अडवणूक केली. पण अशा लोकांविरुद्ध न कुरकुरता अगर त्यांच्याबाबत कसलाच ओरखडा न ओढता अण्णांनी संशोधन आणि संशोधन हेच आपले जीवितकार्य मानले. अण्णांच्या स्वभावातील हे असामान्यपण संशोधकांसाठी प्रेरणादायी असेच आहे.

बऱ्याच वर्षांपूर्वी अण्णांना भेटण्यासाठी गेलो असता त्यांचे लोखनाचे काम सुरू होते. संशोधनासाठी विविध विषयांची जुळवाजुळव करून लेखन करणारे अण्णा एकाच वेळी किती पुस्तकांचे काम करतात ही आपल्या सारख्या सामान्यांच्या आकलनापलीकडची बाब. नेमके सांगता



अनुक्रमणिका



येणार नाही, पण बहुतेक त्यांचे खंडोबा, शंभूमहादेव यावर लेखन सुरू असावे. त्यांनी मला फलटण-बारामतीच्या उत्तर आणि श्रीगोंद्याच्या दक्षिण या पट्ट्यात बाणगंगा नावाची नदी, ओढा आहे का; या नदीबाबत काही दंतकथा, लोककथा, आख्यायिका मिळाल्या तर मला कळवा असे सुचविले. सुटीच्या काळात प्रा. विश्वनाथ थोपटे यांच्यासह शनी शिंगणापूर, फलटण, बारामती, दौंड परिसरात स्कूटरवर शोधयात्रा केली. गावोगावची मंदिरं पाहून अनेकांना बाणगंगेची विचारणा केली; पण आम्हाला काही बाणगंगेचा शोध लागला नाही. मात्र, या निमित्ताने शिखर शिंगणापूरची पहिली धनगर वेस, शंभू महादेवाच्या मंदिर परिसरात असलेली धनगर- लिंगायतांची स्मशान भूमी पाहावयास मिळाली. महादेव शूद्र देवता असली तरी ही विष्णूचा वराह अवतार संबोधून वैष्णव भक्तांकडून मंदिरात सुरू असलेला पूजापाठ पाहावयास मिळाला. याच डोंगराच्या पायथ्याशी मेंढ्या सांभाळत असलेला धनगर महिलेजवळ स्कूटर थांबवून 'बाई, तुम्ही नाही गेलात महादेवाच्या जत्रेला.'' अशी विचारणा केली असता ती मेंढपाळ बाई सहज बोलून गेली, 'देव आमचाच तर हाये!' तो आमच्याच संग असतो,' असं म्हणत तिने एक ओवीच गायिली.

*शिंगणापूरच्या डोंगरी हंडा हंडा दूध तापते ।*
*अन् माझ्या गं महादेवाचं मंदिर*
*मी ओल्या केसानी झाडिते ।।*

या सर्वच घटना बाणगंगेचा शोध घेता घेता महादेव देवतेवर व त्याच्या पूजाधिकारावर अधिकार सांगणाऱ्या खऱ्या भक्तावर प्रकाश टाकणारा असल्याचा अनुभव आला.

सन १९८९ साली श्रीगोंदा ( जि. अहमदनगर) येथे श्री छत्रपती शिवाजी महाविद्यालयात घेण्यात आलेल्या आठव्या लोकसाहित्य परिषदेसाठी आवर्जुन येण्याचे आग्रहाचे निमंत्रण अण्णांना घरी जाऊन दिले. अण्णा परिषदेसाठी आले नाहीत. मात्र, अण्णांना गुरू मानणारे जर्मनीचे दक्षिण आशियाई अभ्यास संस्थेचे प्रमुख, प्राच्यविद्या विशारद डॉ. गुंथर सोन्थायमर यांना परिषदेचे उद्घाटक पाहुणे म्हणून अण्णांनी पाठवले. त्यामुळे लोकसाहित्य अभ्यासकांमध्ये चैतन्य निर्माण झाले. परिषदेला उपस्थित राहू न शकल्याबद्दल खंत व्यक्त करून परिषदेचा वृत्तान्त मनोभावे समजावून घेणारे अण्णा विरळाच.

लोकजीवानातून लोकसंस्कृती आणि सर्वच ज्ञानशाखा विकसित होतात. या विविध ज्ञानशाखांमधील संशोधनासाठी समाज अभ्यास आवश्यक ठरतो. प्रत्येक समाजजीवनाचा अभ्यास म्हणजे जन्मापासून मृत्यूपर्यंतच्या त्या त्या समाजातील रूढी, परंपरा, जीवनसरणी, साधने, देव-देवता, धर्मविधी, कुळाचार समजावून घेणे होय. अण्णांनी कसल्याच सवंग लोकप्रियतेच्या वाटेला न जाता, कोणा व्यक्तीच्या अगर दुराग्रही विचाराच्या अधीन न होता विवेकीवृत्तीने अण्णांनी अखंड आयुष्य लोकसंस्कृतीच्या संशोधनासाठी वेचले संशोधकांना लोकसाहित्य अभ्यासाची नवी नवी दालने आपल्या संशोधनातून खुली केली. महाराष्ट्राचा आणि देशाचा देव्हारा आपल्या संशोधनाने समृद्ध केला. अण्णांबाबत बोलताना प्राचार्य शिवाजीराव भोसले यांनी दिलेली प्रतिक्रिया फारच बोलकी आहे. ''आम्ही वयाने म्हातारे झालो, पण ढेरेअण्णा वयाने म्हातारे झाले तरी त्यांच्या नवनवीन संशोधनग्रंथांमुळे तरुण राहिले.''

अण्णांचे सामान्यांतील असामान्यपण ज्यांना ज्यांना भावले, रुचले त्यांना अण्णांच्या सहवासाने, स्वभावाने, संशोधनाने प्रेरित केले. ज्यांना त्यांचे शहाणपण रुचले नाही, पचलं नाही त्यांनी अण्णांचा दुस्वास केला. त्यांनाही अण्णांनी कधी दुखावले नाही की त्यांना कधी ओरखडा काढला नाही. कोणाशीही वाद न घालता ते संशोधनमय जीवन जगले. सर्व जाती-धर्मांचा, संप्रदायांचा, देव-देवतांचा अभ्यास करूनही अण्णा विवेकी, विज्ञाननिष्ठ जीवन जगले. त्यामुळे लोकसंस्कृतीच्या अभ्यासकांच्या मनात लोकसंस्कृतीतील उपास्यदेवता व उपासकांचा उपासक अशी अण्णांची प्रतिमा चिरंतन राहणार यात शंका नाही. अशा या लोकसंस्कृतीच्या उपासकाला भावपूर्ण आदरांजली!

◆

**प्रा. डॉ. बाळासाहेब बळे**
चलभाष : ९४२१९३६१७१
balasaheb.bale@gmail.com



अनुक्रमणिका



लेख

लक्ष्मणशास्त्री जोशी





**लज्जागौरी म्हणजे योनीच्या दैवतीकरणाने भावलेले देवीचे एक मूर्त स्वरूप आहे. देवीची पार्वती, दुर्गा, लक्ष्मी, श्री, अंबा, सरस्वती, काली इत्यादी संस्कृत आणि अन्य प्राकृत देशी नामांनी आणि विविध रूपांनी भारतात पूजा होत असते. भारतात देवीची तीर्थस्थाने आणि देवालये जितकी आहेत, तितकी इतर शिव, विष्णू, गणेश, हनुमान, दत्तात्रय, भैरव इ. देवांची नाहीत. इतकी या शक्तिपूजेची व्यापकता आहे.**



# लज्जागौरी

## मातृपूजक संस्कृती व देवीपूजा पद्धतींच्या अध्ययनाचे उत्कृष्ट साधन

भारताच्या धार्मिक संस्कृतीच्या इतिहासात इतिहासपूर्व कालापासून आजच्या विसाव्या शतकापर्यंत स्थिरावलेल्या शक्तिपूजेच्या एका घटकाचे म्हणजे लैंगिक प्रतीकांचे अत्यंत मूलगामी असे संशोधन करणारे 'लज्जागौरी' हे पुस्तक आहे. अद्ययावत संशोधित साधनांच्या आधारे आणि सर्व नव्या सामग्रीच्या प्रकाशात विखुरलेल्या वा उत्खननात सापडलेल्या प्रतीकांचा आणि मूर्तींचा अभ्यास करून सुसंगत असे मनन यात प्रसन्न शैलीने व्यक्त केले आहे. उत्खननात मिळालेल्या आणि निरनिराळ्या तीर्थस्थानांत, मंदिरांत व अन्यत्र पाहिलेल्या मूर्तींची आणि प्रतीकांची चित्रे व स्वतंत्र चित्रपत्रे यात अंतर्भूत केली आहेत. आदिवासी जमातीपासून तो अत्यंत सुसंस्कृत अशा भारतीय समाजातील लैंगिक शक्तिपूजेचे संदर्भ दाखवून यात विवेचन केलेले आहे. हिमालयापासून कन्याकुमारीपर्यंतच्या प्रदेशातील लैंगिक शक्तिपूजेची प्रतीके वा मूर्ती यांचा संदर्भ अर्थपूर्ण रीतीने उकलून दाखविलेला आहे.

हे करीत असताना श्रीमती स्टेला क्रामरिश यांच्या एका प्रसिद्ध लेखात या शक्तिपूजेचा ऋग्वेदातील अदिती या विश्वजननी, विश्वरूपा व सर्वदेवजननी देवतेशी जोडलेला संबंध कसा बरोबर आहे हे दाखवून दिलेले आहे. त्याबरोबरच स्टेला क्रामरिश यांच्या प्रतिपादनाला डॉ. ह. धी. सांकलिया यांनी विरोध केला आणि ही योनिस्वरूप शक्तिदेवता इजिप्तमधून रोमन संपर्काच्या काळात ख्रिस्तोत्तर पहिल्या एक-दोन शतकांत भारतात आली असे मत मांडले, ते साधार खोडले आहे.

लज्जागौरी म्हणजे योनीच्या दैवतीकरणाने भावलेले देवीचे एक मूर्त स्वरूप आहे. देवीची पार्वती, दुर्गा, लक्ष्मी, श्री, अंबा, सरस्वती, काली इत्यादी संस्कृत आणि अन्य प्राकृत देशी नामांनी आणि विविध रूपांनी भारतात पूजा होत असते. भारतात देवीची तीर्थस्थाने आणि देवालये जितकी आहेत, तितकी इतर शिव, विष्णू, गणेश, हनुमान, दत्तात्रय, भैरव इ. देवांची नाहीत. इतकी या शक्तिपूजेची व्यापकता आहे. लज्जागौरी म्हणजे स्त्री- योनिरूप देवता तिच्याबरोबर तिच्या संदर्भातील इतर देवदेवता यांचाही परामर्श या पुस्तकात घेतलेला आहे. वेदपूर्वकालीन सिंधू संस्कृतीतील लिंगदेवता व योनिदेवता यांच्याशी लज्जागौरीचा ऐतिहासिक संबंध कसा पोचतो, हेही निर्दिष्ट केले आहे.

ऋग्वेदातील अदिती देवता ही आर्यांची मूलभूत देवता आहे; परंतु ऋग्वेद किंवा सगळ्या वेदसंहिता यांच्यामधील सर्व प्रमुख देव आदित्य म्हणजे अदितिपुत्र आहेत. मित्र, वरुण, इंद्र, अर्यमन, भग, सूर्य, विष्णू, सविता इत्यादी देव आदित्यच होत. ऋग्वेदात अदितीवर सहजच सूक्ते आहेत, परंतु अदितीचा इतर देवांच्या स्तोत्रांमध्ये वारंवार उल्लेख आलेला आहे. वैदिक मुख्य देवांचा ऋग्वेदामध्ये किंवा अन्य वेदांमध्ये आदित्य या विशेषणाने म्हणजे मातृनामावरून उल्लेख होतो, पितृनामावरून होत नाही. यावरून असा कयास करता येतो, की आदित्यपूजक वैदिक समाजातील कुटुंबसंस्था ही प्रथमं मातृप्रधान असावी आणि नंतर पितृप्रधान झाली असावी आणि त्यामुळे ऋग्वेदातील कुटुंबसंस्थेत स्त्रीला दुय्यम स्थान प्राप्त झाले.



अनुक्रमणिका

अदितीची पूजा मुळात कलश स्वरूपात होत असणे शक्य आहे. ही गोष्ट यजुर्वेदाच्या वाजसनेयी संहितेतील (अध्याय ११) उखासंभरण मंत्रांवरून सूचित होते. मस्तकावर चंद्राची सूक्ष्मकला असलेली, सुरेख वेणी घातलेली, त्यावर कनकाभरण वा मुकुट असलेली आणि संभोग घेणाऱ्यास विलासाने जवळ घेणारी, असे अगोदरच्या मंत्रात अदितीचे वर्णन केले आहे. उखा म्हणजे अग्नी ठेवण्याचा मृत्तिकेचा कलश होय. उखा अग्निचयन नामक यज्ञामध्ये आवश्यक असते. उखापात्राच्या मुखाभोवती कड असते. अदितीची रशना म्हणजे कंबरेस बांधावयाची साखळी, असे तिला म्हटले आहे. त्या कडेखाली स्तनांचे आकार दिलेले असतात (वाजसनेयी संहिता अ. ११-५९, महीधरभाष्य). त्या पात्राच्या पोटात अग्नी ठेवायचा असतो. या पोटाला उपस्थ (म्हणजे योनी ) या शब्दाने वाजसनेयी संहितेने निर्दिष्ट केले आहे. उखापात्र म्हणजे कुंभच होय. हल्ली अग्निहोत्री क्वचित सोमयागाबरोबर अग्निचयनाचेही अनुष्ठान करतात. निदान २५ वर्षांपूर्वी तरी करीत होते हे आम्हास माहीत आहे, परंतु हे उखापात्र कसे बनवीत असत, हे आम्हास माहीत नाही.

कुंभ शब्दाचा वाचस्पत्यकोश व राजतरंगिणी (३-४५६) प्रमाणे एक अर्थ स्वैरिणी वा साधारणी (ऋग्वेद १-१६७-४) स्त्री असा आहे. साधारणी म्हणजे अविवाहित मुक्त स्त्री. अगत्य व वसिष्ठ यांना कुंभयोनी किंवा कुंभोद्भव किंवा कुंभसंभव म्हणतात. अनेक पुराणांत सांगितलेल्या कथेप्रमाणे मित्रावरुणांना उर्वशी किंवा घृताची या अप्सरेला पाहून कामवासना उत्पन्न झाली व त्यांनी आपले रेतसिंचन कुंभामध्ये केले आणि त्यातून अगस्त्य व वसिष्ठ निर्माण झाले. यज्ञातील मैत्रावरुण संज्ञक ऋत्विजापासून साधारणी स्त्रीच्या ठिकाणी अगस्त्य व वसिष्ठ यांची उत्पत्ती झाली, असे ही मिथ्यकथा सूचित करते. यज्ञात प्रजोत्पादनाचा विधी होत असावा, ही गोष्ट द्रौपदीच्या जन्मकथेवरूनही सूचित होते, हेही या संदर्भात लक्षात येते. यास दुसरे प्रमाण असे, की छांदोग्य उपनिषदात म्हटले आहे, की वामदेव्यव्रत आचरणाऱ्या सामवेदी ऋत्विजाने संभोग मागणाऱ्या कोणत्याही स्त्रीला नकार देऊ नये.

अप्सरा या अविवाहित व मुक्त स्त्रिया होत्या याबद्दल मतभेद असण्याचे कारण नाही. महाभारतातील द्रोणाचार्यांनी जन्म द्रोणकलशात झाला म्हणून त्यांना 'द्रोण' म्हणतात. भारद्वाजमुनींनी घृताची नावाच्या अप्सरेला वस्त्र नेसत असताना नग्न स्वरूपात पाहिल्यानंतर त्यांचे रेतस्खलन झाले व ते रेत कलशात त्यांनी ठेवले; त्यातून द्रोणाचार्य उत्पन्न झाले (महाभारत, आदिपर्व, ५७, ८९, १२९, ५ : १५४.५) शाक्तपंथीय वाममार्गातही पूजेच्या वेळी योनीचे प्रतीक म्हणून कलशपूजा करतात. या पूजासमारंभात सामील झालेल्या मुक्त स्त्रीच्या योनीचीही पूजा सांगितली आहे.

हिंदूंच्या कोणत्याही मंगल कार्यात वरुणाची पूजा म्हणजे पाण्याने भरलेल्या कलशाची पूजाच असते. मात्र, हा कलश अदिती म्हणून संबोधिला जात नाही. ऋग्वेदातच अदिती ही दुय्यम देवता ठरली. त्यामुळे अदितीचे विस्मरण झाले असावे. ऋग्वेदात व अन्य वेदांमध्ये गाईचे माहात्म्य वर्णिले आहे. तिला अदिती ही संज्ञा देऊन देवजननी व विश्वजननी म्हणूनही अथर्ववेदात तिचा निर्देश केला आहे. एवढेच नव्हे, तर गाईचा पुच्छभाग सर्व धार्मिक हिंदू लोक पूज्य मानतात व त्याला पूज्यबुद्धीने स्पर्श करतात. हा पवित्र आचार एक प्रकारे योनिपूजेचाच अवशेष असावा, असा कयास करता येतो. शिवमंदिरातील नंदीच्या वृषणाला स्पर्श करून त्याच्या शिंगांतून शिवाच्या पिंडीचे दर्शन घेणे अधिक पुण्यकारक मानतात. संस्कृतमध्ये 'गो' शब्द पुल्लिंगीही आहे, हे या संदर्भात लक्षात घ्यावे. डॉ. ढेरे यांनी शांकभरी अथवा बनशंकरी या देवीच्या माहात्म्याचा उल्लेख केला आहे. ऋग्वेदातील अरण्यानी या देवतेच्या सूक्ताची आठवण या वेळी होते.

जोतीबा व सुब्रम्हण्य (स्कन्द) या देवांचाही उद्‌बोधक उलगडा डॉ. ढेरे यांनी केलेला आहे. इतिहासाचे, विशेषतः सांस्कृतिक इतिहासाचे व्युत्पत्तिशास्त्र (फायलॉलॉजी ) हे एक महत्त्वाचे साधन आहे, ही गोष्ट युरोपात अठराव्या शतकात इतिहासाचे तत्त्वज्ञान प्रथम मांडणाऱ्या विको यांनी सांगितली आहे. शब्दाच्या व्युत्पत्तिशास्त्राचा योग्य उपयोग कसा करावा, याचे निदर्शन या पुस्तकातील अनेक प्रश्नांच्या विवेचनामध्ये मिळते. भारतीय पंडितांना गेल्या शतकात महत्त्वाच्या शब्दांची व्युत्पत्ती शोधताना संस्कृतकडे धाव घ्यावी असे वाटत असे. आता ही पद्धत विद्वानांनी मोडली आहे; आणि अनेक प्राचीन भाषांचा, विशेषतः ऑस्ट्रिक व द्रविडी भाषाकुलांचा सावधपणे उपयोग करण्याची योग्य प्रथा सुरू झाली आहे. त्या प्रथेची उपयुक्तता या पुस्तकावरून ध्यानात अधिक भरते.

स्कंद या देवाचे माहात्म्य प्राचीनकाळी मोठे होते; त्यामुळे अष्टादश पुराणांमध्ये स्कंद पुराणाचा अंतर्भाव केला गेला. महाभारत, वाल्मीकी रामायण, पद्मपुराण, मत्स्यपुराण व वायुपुराण यांच्यामध्ये स्कंद देवाची उत्पत्तीदेखील कुंडामध्ये म्हणजे कुंभामध्येच दाखविली आहे. स्वाहादेवीला अग्निदेवाकडून मिळालेल्या वीर्याची तिने कुंडात स्थापना केली. त्यापासून स्कंदाचा जन्म झाला, असे तेथे म्हटले आहे.

कवडी हे योनिप्रतीक म्हणून या पुस्तकात (पृष्ठ ६७-७०) चर्चिले आहे. लज्जागौरी या संज्ञेतील लज्जा पदाची व्युत्पत्ती सांगितली; परंतु गौरी शब्द संस्कृत शब्द म्हणून मान्य केला आहे. आम्हास वाटते, की गौरी शब्द हा मूळचा तमिळ असणे शक्य आहे. तमिळ भाषेत गौरी म्हणजे कवडी असाही अर्थ होतो. लज्जागौरी हे पुस्तक म्हणजे मातृपूजक संस्कृती व विशेषतः भारतातील देवीपूजा पद्धती यांच्या अध्ययनाचे एक उत्कृष्ट साधन आहे, असे निश्चितपणे म्हणता येते. आधुनिक मनोविश्लेषणशास्त्रातील सांस्कृतिक मानसशास्त्राच्या अध्ययनाला व संशोधनालाही याचा चांगला उपयोग होईल.

◆



अनुक्रमणिका



लेख

नरहर कुरुंदकर

# शक्तिपीठांचा शोध



**ढेरे यांचे संशोधन निर्विवाद आणि बिनतोड असते, असे निदान मी तरी मान्य करणार नाही. वादरहित संशोधन करणाऱ्या अभ्यासकांचा बहुतेक काळ साधने छापण्यात व त्यावर टीपा देण्यात व्यतीत होत असतो. हेही काम मी महत्त्वाचे मानतो; पण जिथून मीमांसेचा आरंभ होतो, तिथून विवाद्यतेचाही जन्म होतो याला इलाज नाही. ढेरे माझ्यासारखे भौतिकवादी नास्तिक नाहीत. त्यांचा पिंड श्रद्धाधारकाचा आहे. पण जेव्हा पुरावा काही निराळेच सांगू लागतो तेव्हा त्यांचाही नाइलाज होतो. गेल्या एक तपात प्रस्थापित मतांना सर्वांत जास्त हादरे त्यांनी दिलेले आहेत.**



**मा**झे मित्र रा. चिं. ढेरे हे आता संशोधनाच्या क्षेत्रात नवखे राहिलेले नाहीत. प्राचीन मराठी वाङ्मयाचे व भारतीय संस्कृतीचे संशोधक, अभ्यासक आणि मीमांसक म्हणून आता त्यांना स्थिर प्रतिष्ठा मिळालेली आहे. त्यांच्या-माझ्या पिढीतील विद्वानांच्यामध्ये तर ढेरे सर्वांत मान्यवर आहेतच, पण हयात ज्येष्ठांच्यामध्येसुद्धा त्यांच्याइतका चौरस व व्याप असणारा अजून दुसरा मराठीत कोण आहे हे एकदा तपासूनच सांगावे लागेल. ढेऱ्यांचे लहान-मोठे कोणतेही पुस्तक असले, तरी त्यात काही नवे संशोधन; अनाग्रही, चौरस आणि बारकाईची अशी पुराव्याची मांडणी व थोडी काव्यमयतेकडे झुकणारी भाषाशैली यांचा समन्वय तिथे असतोच. आता हेही इतके सरावाचे झाले आहे की त्यात कौतुकाने सांगावे अशी नवलाई उरलेली नाही.

ढेरे यांचे संशोधन निर्विवाद आणि बिनतोड असते, असे निदान मी तरी मान्य करणार नाही. वादरहित संशोधन करणाऱ्या अभ्यासकांचा बहुतेक काळ साधने छापण्यात व त्यावर टीपा देण्यात व्यतीत होत असतो. हेही काम मी महत्त्वाचे मानतो; पण जिथून मीमांसेचा आरंभ होतो, तिथून विवाद्यतेचाही जन्म होतो याला इलाज नाही. ढेरे माझ्यासारखे भौतिकवादी नास्तिक नाहीत. त्यांचा पिंड श्रद्धाधारकाचा आहे. पण जेव्हा पुरावा काही निराळेच सांगू लागतो तेव्हा त्यांचाही नाइलाज होतो. गेल्या एक तपात प्रस्थापित मतांना सर्वांत जास्त हादरे त्यांनी दिलेले आहेत. प्रज्ञावंत अभ्यासका जवळ जमणाऱ्या माहितीचे स्वरूप सुपीक जमिनीत पडणाऱ्या पाण्याप्रमाणे असते. तेथे प्रत्येक थेंब ओलाव्याची नुसती खोली आणि व्याप्तीच वाढवीत नसतो, तर नवसर्जनही करीत असतो. क्रमाने ढेरे आपल्या प्रज्ञेला प्रामाणिक राहून मीमांसेच्या क्षेत्रात खोलवर गुरफटत जात आहेत. हे क्षेत्रच असे आहे, की जिथे निरुपद्रवी दिसणारा एखादा धागा स्वतःलाच हादरा देणाऱ्या गुहेपर्यंत तुम्हाला नकळत घेऊन जातो. शक्तिपीठांच्या शोधात ढेरे यांच्या बाबतीत असा काही प्रकार घडू पाहत आहे. या ठिकाणी उभे राहून ढेऱ्यांशी भांडण उकरून काढण्यात जी मौज आहे ती नव्याने उजेडात आलेल्या अपरिचित पोथ्यांची नावे ऐकण्यात



अनुक्रमणिका

निश्चितच नाही.

ढेरे यांचे नवे पुस्तक (खरे म्हणजे तो एक विस्तृत लेखच आहे.) काही शक्तिपीठांचा नव्याने शोध घेत आहे. सर्व भारतभर नानाविध नावांनी व रूपांनी चालणारी देवीची उपासना आहेच. या उपासनेची प्रमुख केंद्रे कोणती यांच्या विविध याद्या आहेत. या याद्यांच्यापैकी एक महत्त्वाची यादी पुराणांमधून आणि तंत्रग्रंथांमधून येणारी १०८ शक्तिकेंद्रांची यादी आहे. मला स्वतःला ही यादी इ. स. १००० पेक्षा फारशी जुनी वाटत नाही. या यादीत असणाऱ्या स्थळांची निश्चिती करणे हे एक महत्त्वाचे काम आहे. ढेरे यांनी या यादीतील दोन स्थळांची नोंद केली आहे व एक तिसरे प्राचीन शक्तिपीठही नोंदविलेले आहे. १०८ च्या या यादीतील मुकुटेश्वरीचे माकोट हे पीठ म्हणजे आजचे कर्नाटकातील नंदिकेश्वर (ता. बदामी, जि. विजापूर) व या यादीतील युगुलेचे आलापूर म्हणजे आजचे अलंपूर (आंध्र प्रदेशातील महबूबनगर जिल्ह्यातील गाव), असे त्यांनी पुराव्याने दाखवून दिलेले आहे. त्याखेरीज नागपूर जिल्ह्यातील माहूरझरी हेही प्राचीन शक्तिपीठ असल्याची त्यांनी साधार नोंद केली आहे.

या पुस्तिकेपुरता ढेरे यांचा दावा इतकाच आहे. अत्यंत निरुपद्रवी चेहरा करून ते सांगतील, "माकोट म्हणजे नंदिकेश्वर हे मी प्रथमच सिद्ध करीत आहे. जरी यापूर्वी ख्यातनाम संशोधक डॉ. पांडुरंग देसाई यांनी अलंपूर म्हणजे आलापूर हे दाखवून दिले असले, तरी अमुक एक देवी म्हणजे युगुला हे मी प्रथमच दाखवीत आहे. वाकाटकांच्या ताम्रपटात येणारे पृथ्वीपूर म्हणजे माहूरझरी, हेही मी प्रथमच सांगत आहे." ढेरे यांचे हे म्हणणे अगदी खरे आहे. संशोधनाच्या क्षेत्रात पुराव्याची संगती जुळवण्याला, .चपखल मांडणीला व प्रथमच एखादा मुद्दा सिद्ध करण्याला खूपच महत्त्व असते; पण हे पूर्ण सत्य नव्हे. ही जर केवळ स्थळनिश्चितीची बाब असती, तर मग या पुस्तिकेकडे फारसे लक्ष देण्याचीही गरज नव्हती. एक टिपण म्हणून त्याकडे पाहणे व नोंद घेणे पुरेसे ठरले असते. या पुस्तिकेचे खरे महत्त्व ढेरे यांचा पुरावा आणि त्याची संगती जुळवण्याची त्यांची पद्धत यात आहे. ढेरे यांचे विवेचन क्रमाने एका अत्यंत वादग्रस्त सिद्धांताकडे सरकत आहे. ढेरे महाशयांना सर्व समजुतींना जो एक जोराचा धक्का द्यायचा आहे, त्याची या पुस्तिकेत पूर्वतयारी आहे. मला जर त्यांचा प्रमुख सिद्धांत मान्य नसता, तर मी किमान दुप्पट पाने लिहून त्यांचे खंडन करणे आवश्यक मानले असते.

ढेरे यांना एका उपासना-परंपरेकडे व त्या परंपरेतील परिवर्तनांच्याकडे- परंपरेच्या उन्नयन-रूपांतर-ऱ्हासाकडे लक्ष वेधायचे आहे. सर्व भारतभर अतिप्राचीन काळापासून अलीकडच्या काळापर्यंत एका विशिष्ट प्रकारच्या देवीच्या मूर्ती उपलब्ध होतात. या मूर्ती आसामपासून अतिदक्षिणेपर्यंत पसरलेल्या आहेत. त्यांचे काळही निरनिराळे आहेत. या मूर्तींचे स्वरूप कसे आहे? त्यांना डोके नसते. त्या नग्न आणि उताण्या असतात. कुठे पुष्ट स्तन असतात, कुठे नसतात; पण योनिदर्शनाला प्राधान्य असते. त्याला उपकारक अशी पायांची रचना असते. शिरोहीनता, नग्नता व उत्फुल्ल योनी ही या मूर्तींची कायम वैशिष्ट्ये आहेत. ही देवता योनिरूपिणी महानग्ना जगन्माता आहे. तिची उपासना जरी पुत्रदायी देवता म्हणून होत असली, तरी ती खरे म्हणजे सर्व सृजनांची देवता आहे. ही देवताच लंजिका ऊर्फ लज्जागौरी असून, नंदिकेश्वर हे मूळचे लंजिकेश्वर आहे व माकोट हे याच देवीचे नाव असून, त्यातील 'कोट' शब्दाचा अर्थ लंजिकेप्रमाणेच 'नग्ना' असा आहे. ढेरे यांना असे म्हणावयाचे आहे, की ही योनिमातृका म्हणजे नंदिकेश्वरची लंजिका, अलंपूरची युगुला ऊर्फ जोगुळांबा असून, तीच यल्लमा आणि रेणुका आहे.

ही पुस्तिका म्हणजे यापुढे येणाऱ्या एका प्रदीर्घ आणि गुंतागुंतीच्या विवेचनाचा प्रारंभ आहे. यापुढचा टप्पा हे सांगण्याचा आहे, की आसाममधील प्रसिद्ध कामाख्या हीच केवळ योनिमातृका नसून माहूरची रेणुकाही मुळात योनिमातृकाच असल्याचा पुरावा आहे. कारण रेणुका म्हणजे वारूळ हे योनीचेच एक प्रतीक आहे. कोल्हापूरची महालक्ष्मी, तुळजापूरची भवानी याही मुळातच योनिमातृका असल्याचा पुरावा त्या मूर्तींच्या शिरोभागी आहे. सर्व भारतभर जसा शंकराच्या लिंगपूजेचा सार्वत्रिक संप्रदाय आहे, तसा जगन्मातेच्या योनिपूजेचाही सार्वत्रिक आणि प्राचीन संप्रदाय आहे.

देवी-उपासनेच्या निमित्ताने हा संप्रदाय क्रमाने विकसित आणि रूपांतरित होत आला. या रूपांतरात काही टप्पे उन्नयनाचे आहेत. या टप्प्यांमध्ये या देवता कधी उमेचे तर कधी लक्ष्मीचे रूप घेऊन विष्णुपत्नी, शिवपत्नी होतात. कधी त्यांची मूळ रूपे क्षुद्रदेवता आणि बालग्रह अशी रूपांतरित होतात. कधी मधूनच समाजाचा ऱ्हासकाळ देवतेच्या मूळ रूपाला भ्रष्ट प्रतिष्ठा मिळवून देतो. हे रूप शाक्त संप्रदायात दिसते. यानंतर ढेरे असे म्हणणार, की परशुराम-रेणुका, रेणुका-जमदग्नी यांच्याशी निगडित असणारा सर्व भार्गवीय कथासमूह फारसा जुना नाही. तो उत्तरकालीन, बहुतेक चौथ्या-पाचव्या शतकानंतरचा पसारा आहे. जेव्हा आपण धड सोडून शिराची-फक्त मुखवट्यांची म्हणजे तांदळ्याची पूजा करतो (उदाहरणार्थ, माहूरची रेणुका), त्या वेळी आपण देवीची पूजा करीत नसून, घटाची म्हणजे पुन्हा योनीची पूजा करीत असतो. तेर येथील मृत्तिकाचित्रात हा घट स्पष्ट आहे व तो योनिरूप आहे. अनेक पौराणिक कथा उलथ्यापालथ्या करणारा आणि आर्यपूर्व उपासनांकडे घेऊन जाणारा असा हा प्रवास आहे. ढेरे कोणत्या दिशेने जात आहेत याची येथे फक्त कल्पना दिली आहे. पण या दिशादर्शनावरून इतके समजायला हरकत नाही की ही केवळ स्थलनिश्चिती नव्हे. या पुस्तिकेत गृहीत व अनुस्यूत मीमांसेचा व्याप फार मोठा आहे.

या योनिमातृकांच्या मूर्तींविषयी याहीपूर्वी संशोधकांनी विवेचने केलेली आहेत. श्रीमती स्टेला क्रामारिश यांना या मूर्ती वैदिकी अदितीच्या वाटतात, कारण अदिती महानग्ना व उत्तानपाद आहे. डॉ. सांकलिया यांच्या मते ही मूळची इजिप्तमधील बौबो नावाची देवता असून, रोमन संपर्काच्या काळात खिस्तोत्तर पहिल्या-दुसऱ्या शतकात तिचे भारतात आगमन झाले आणि नंतर झपाट्याने या देवतेचे भारतीयीकरण झाले. अजून कुणाला ही देवता अनार्यांची भूमिरूप मातृदेवता वाटते. या नानाविध स्पष्टीकरणांपैकी निर्णायकरीत्या चुकीची असेल तर ती डॉ. सांकलियांची भूमिका आहे. सांकलियांच्यासारख्या आदरणीय श्रेष्ठांविषयी हे म्हणू नये, पण म्हणणे भाग आहे की त्यांची विचार करण्याची पद्धतच चुकीची आहे.

ज्या वेळी एखादी बाब प्राचीन काळात दिसत नाही (उदाहरणार्थ, ज्योतिषशास्त्रातील राशींची कल्पना) आणि पुढच्या काळात मात्र ती बाब सार्वत्रिक होते, त्या वेळी असा प्रश्न विचारता येतो, की या बाबींचा मूळ उगम कोठे आहे? पण जी घटना भारतभर अतिप्राचीन काळापासून सार्वत्रिक आहे, तिच्याबाबत 'ती आली कुठून?' हा प्रश्न विचारणे चुकीचे आहे. सिंधुसंस्कृतीपासून आजतागायत भारतभर आढळणारी लिंगपूजा कुठून आली, हे विचारण्यातच अर्थ नसतो. हेच मातृदेवतांना लागू आहे. मातृदेवतांचा उगम भारतात मानवसंस्कृतीच्या आरंभाइतका जुना आहे, तितका योनिपूजनाचा पुरावाही दाखवता येतो. ऋग्वेदाच्या काळीच 'भग' ही देवता पुरुषरूपाने स्वीकारण्यात आलेली आहे. ही घटना पुरेशी बोलकी आहे. मुळात शिरोहीन योनिमातृकांना बौबोप्रमाणे समजणेच चुकीचे आहे.

मी या योनिदेवतेला वैदिक अदितीही मानू शकत नाही. असलेच तर शिष्टांनी मान्य केलेले अदिती हे योनिमातृकेचे एक रूप मानता येईल. जुडाइस्ट परंपरेच्या धर्माने अशी एक समजूत निर्माण केली आहे, की अडाणी लोक पशुपक्षी, वृक्ष व वनस्पती, दगडधोंडे यांना देवता समजतात. ही समजूतच मुळात चुकीची आहे. आदिम समाजात पशू-पक्षी-वृक्षादींचे पूजन असते हे खरे आहे, पण ती देवतेची प्रतीके असतात व प्रतीक म्हणून पूज्य असतात. विकसित धर्मपरंपरासुद्धा हीच कल्पना अनुसरतात. आद्य मानवसमाजात सर्व समृद्धी आणि वैभव उत्पत्तिरूप असते. या उत्पत्तीच्या उपास्यदेवता नर आणि मादी रूपात दिसतात. नररूपाने महालिंगदेव असतो. वृषभ, अश्व, शृंग, द्यौ ही त्याची रूपे आहेत. नारीरूपाने महायोनिदेवता असते. घट, कमल, पृथ्वी, वारूळ, गौ ही सारी या देवतेची प्रतीके आहेत. ब्रह्मा, विष्णू आणि शिव हे तिघेही मूळ रूपांत लिंगदेवच आहेत. कदाचित ढेरे सर्व देवीरूपे मुळात योनिमातृका आहेत, हे सांगणारा पुरावा तपशिलाने गोळा करतील. शिवलिंग पाहताना हात-पाय व डोके नाही, हे विसरायचे असते. ती देवता लिंगस्वरूपच आहे. कामाख्या अशी सर्वस्वी योनिस्वरूप आहे. घट पाहताना म्हणजे देवीचे तांदळे

पाहताना उरलेले शरीर पाहायचे नसते. शिरोहीन योनिदेवता पाहताना शिर पाहायचे नसते. शिराच्या जागी कमळ व चक्र म्हणजे योनीच आहे. या मूर्ति शिरोहीन नसून योनिमयी आहेत, योनिस्वरूप आहेत, इतकेच काय ते.

'शक्तिपीठांच्या शोधां'च्या रूपाने ढेरे एका व्यापक व मूलगामी संशोधनाला हात घालीत आहेत. पुढे येणाऱ्या त्यांच्या ग्रंथाला मी सुयश चिंतितो. पण यापुढच्या वाटचालीत त्यांना थोडे धीटही व्हावे लागेल, सावधही व्हावे लागेल असे वाटते. देवतांचा शोध घेताना उपासकांचा व उपासनांचा शोध घ्यावाच लागतो, नाही तर सांकलियांच्याप्रमाणे जगन्मातेला इजिप्ती देवता मानण्याची चूक होते. पण या उपासकांची केवळ वर्तमान परंपरा पाहता येणार नाही. वर्तमान परंपरेत सोज्ज्वळ पुत्रदात्री असणारी देवता हजार- आठशे वर्षांपूर्वी भैरवींच्या तांत्रिक उपासनेचे केंद्र असते. माहूर आणि कोल्हापूर ही अशी केंद्रे असल्याची सूचना महानुभाव वाङ्मयात आहे. रेणुका मूळची महानग्ना आहे, हे सांगण्यासाठी अलीकडच्या काळातील 'केदारविजया'सारखा ग्रंथसुद्धा आधाराला घेणे धोक्याचे आहे. या देवी-उपासनेच्या परंपरेकडे तीन वेगळ्या दिशांनी पाहणे भाग आहे. एक तर पौराणिकांनी आणि स्थलमाहात्म्य ग्रंथांनी उभा केलेला कथासमूह असतो. दुसरे म्हणजे सर्व शाक्त तांत्रिक आपल्या प्राचीन रूपात शैव आहेत. त्यांनी शिव-शक्ती संगम स्वरूपांत शिवाला प्राधान्य देऊन देवीपीठांचा विकास घडविलेला असतो. या सर्व शैवांचा व शाक्तांचा बौद्ध तंत्रपरंपराशी संबंध आहे. शाक्त भासुरानंद हे शैव अभिनवगुप्तांना पूर्वाचार्य मानतात आणि अभिनवगुप्तांचे पूर्वाचार्य वसुगुप्त यांच्यावर बौद्ध तंत्रांचा प्रभाव आहे. शाक्तांनी या शक्तिपीठांना जे शिवसंबद्धरूप दिले आहे ते निराळे आहे. आद्य योनिमातृकांचा उपासनाप्रवाह निराळा आहे. हे तीन धागे परस्परांत मिसळलेले असतात. ते सावधपणे हाताळणे भाग आहे. ढेरे आद्य योनिमातृका आणि शाक्तांची योनिस्वरून शिवानी यांना एकच समजतात की काय, अशी मला शंका येते. या दोन बाबी भिन्न आहेत.

या मातृदेवतांच्या विषयीचे विवेचन एकीकडे पशुपालनाच्या अवस्थेतून क्रमाक्रमाने स्थिरावत जाणाऱ्या व शेतीकडे वळणाऱ्या समाजव्यवस्थेशी निगडित असते आणि दुसरीकडे धर्माच्या आवरणाखाली वावरणाऱ्या प्रबल भौतिकवादाशी निगडित असते. दैवतरूपांचा समाजरचनेशी असणारा सांधा आणि समाजाच्या उन्नतीऱ्हासाचा उपासनेवर होणारा परिणाम सांगण्यासाठी ढेरे यांनी थोडे धीट झाले पाहिजे. त्याशिवाय भोगभिक्षा मागत हिंडणाऱ्या भैरवींकडे वळता येणार नाही. ढेरे यांच्याजवळ परिश्रमशीलता आहे, अनाग्रह आहे, प्रज्ञा आहे. तिन्हींचा समन्वय आहे. तो त्यांच्या सश्रद्ध आस्तिक्यावर मात करणारा ठरो, इतकेच माझ्यासारख्या मित्राला म्हणता येणे शक्य आहे. कारण हा प्रवास आस्तिकांना झेपणारा नाही. ढेरे यांनी या क्षेत्रात जे पहिले पाऊल टाकले आहे ते मोठे सावध, साक्षेपी आणि डौलदार आहे. त्यांच्या पुढच्या महायात्रेचा भरवसा देण्यासाठी ही खूण पुरेशी स्पष्ट आहे.

◆

---

## निवेदन!

वार्षिक ग्रंथ पारितोषिकासाठी खालील परीक्षकांनी काम पाहिले. मागील अंकात अनवधानाने ही नावे छापली गेली नाहीत.

**दीपक करंदीकर, मनोहर सोनवणे, विजया चौधरी, डॉ. कीर्ती मुळीक, डॉ. मनोहर जाधव, डॉ. प्रभाकर देसाई, अंजली कुलकर्णी, श्रीकांत कुलकर्णी, मीलन म्हेत्रे, डॉ. सतीश देसाई, प्रा. भाऊसाहेब भोसले** या सर्वांचे मनःपूर्वक आभार!



अनुक्रमणिका



लेख

सतीश बडवे

# संतसाहित्य समीक्षेतील 'पायोनियर'



**संतसाहित्याच्या अध्ययनाची अनेक नवी क्षितिजे दृष्टिक्षेपात आणण्यासाठी डॉ. ढेरे यांचे लेखन उपयुक्त ठरते. कळवळ्याने लोकांपर्यंत जाणारे, आपला भावानुभव व विचारानुभव लोकमाध्यमातून अभिव्यक्त करणारे, लोकांशी संवादी ठरणाऱ्या कथा-गाथा रचणारे, आपल्या विचारांचा प्रसार व्हावा म्हणून रचना करणारे हे संत होते, अशी डॉ. रा. चिं. ढेरे यांची संतसाहित्याची संकल्पना आहे.**





रामचंद्र चिंतामण ढेरे हे मराठी संशोधनाच्या क्षेत्रातील ठळक नाव आहे. लोकसाहित्य, लोकसंस्कृती, संतसाहित्य, प्राचीन व मध्ययुगीन वाङ्मय, प्राच्यविद्या, भारतीय इतिहास, अशा अनेकविध क्षेत्रांत डॉ. ढेरे यांनी आपली नाममुद्रा उमटवली. संशोधनासाठी सारे आयुष्य पणाला लावणाऱ्यांमध्ये त्यांचे नाव अग्रस्थानी होते. व्यावहारिक वा आर्थिक फायद्यासाठी जेव्हा संशोधन केले जाते तेव्हा ते पोटार्थी संशोधन ठरते; पण या लाभाचा विचार न करता आंतरिक ऊर्मीतून जेव्हा संशोधन केले जाते तेव्हा ते पाठार्थी संशोधन होते. डॉ. रा. चिं. ढेरे यांनी प्रचंड परिश्रम करून आणि भटकंती करून अंस्सल पुराव्यांच्या आधारे केलेले संशोधन आंतरिक ऊर्मीतून केलेले होते. वस्तुस्थितीवर भर देत, व्रतस्थपणे त्यांनी संशोधनाचे अनेक कंगोरे धुंडाळले. भारतीय एकात्मतेची सतत पुष्टी करणारी त्यांची विधायक दृष्टी हा त्यांच्या लेखनाचा खास विशेष होता. आंतरशाखीय अभ्यास पद्धतीने त्यांनी केलेले काम लक्षणीय ठरले.

अनेकविध अभ्यासविषय हा त्यांच्या चिंतनाचा गाभा होता. संतसाहित्य, संतचरित्रे, भक्तिसंप्रदाय, तीर्थक्षेत्र, लोकसाहित्य, लोकसंस्कृती, लोकरंगभूमी अशा अनेकविध विषयांत त्यांनी केलेला संचार थक्क करणारा आहे. कायम पुस्तकांमध्ये दडलेला आणि नव्याच्या शोधात गर्क राहणारा असा संशोधक-



अनुक्रमणिका

अभ्यासक दुर्मिळच म्हणायला हवा. निगडे हे मावळ प्रांतातले गाव. तिथे डॉ. ढेरे यांचा जन्म झाला. मातापित्यांचे छत्र बालपणातच हरपले. पुढे शिक्षणासाठी ते पुण्यात आले. डी. लिट. पर्यंतच्या पदव्या व सन्मान त्यांना मिळाले. प्रारंभीच्या काळात सिद्धेश्वरशास्त्री चित्राव, म. म. दत्तो वामन पोतदार, सरदार आबासाहेब मुजुमदार यांची छत्रछायाही त्यांना लाभली. चिकाटी व व्यासंगाचा त्यांचा आदर्श डॉ. ढेरे यांनी अखेरपर्यंत जपला.

स्वातंत्र्योत्तर काळात संतसाहित्याची जी समीक्षा झाली त्याला विशाल पटावरील संशोधनसिद्धतेचे वळण देणारे संशोधनपर लेखन डॉ. रा. चिं. ढेरे यांनी केलेले आहे. संशोधनाच्या भक्कम आधारामुळे सर्वस्पर्शी दृष्टिकोन या काळात प्रबळ झाला. अनेकविध दुवे त्यातून उकलले गेले. तौलनिक अभ्यासाची दृष्टी, सांस्कृतिक मांडणीला प्राधान्य यामुळे ही वाट अधिक प्रकाशमान झाली. त्यातूनच संतसाहित्याच्या समीक्षेत सातत्याने लेखन करण्याची प्रेरणा निर्माण झाली. संशोधनाचा आधार असल्याने ही समीक्षा अधिक परिपक्वतेकडे झुकू लागली. संतसाहित्याचा आणि लोकसाहित्याचा अनुबंध उलगडत एकूण व्यक्तिवाङ्मयाचा वेगळ्या अंगाने विचार करता येतो. हे वळण लोकतत्त्वीय अध्ययनदृष्टीने अनेक नव्या दिशांचे सूचन करते. अशा प्रकारची समीक्षा ही समीक्षेला नवे परिमाण तर देऊ शकतेच, पण त्यामुळे समीक्षाच सघन, अर्थपूर्ण आणि समृद्ध बनते. डॉ. रा. चिं. ढेरे यांनी हे परिमाण आपल्या लेखनातून मिळवून दिले आहे. विशेष म्हणजे अभिजन संस्कृतीपेक्षाही बहुजन संस्कृतीतील किती तरी दुवे या लेखनात सापडतात. संतसाहित्याचा लोकसाहित्याशी आणि संस्कृतीशी असणारा अनुबंध, या लोकपरंपरेतील रचनांचा त्यावरील परिणाम, लोकमाध्यमांचा संतांनी आपल्या रचनांमध्ये केलेला उपयोग, अशा अनेकांगांनी ही समीक्षा विकसित झाली. डॉ. ढेरे यांनी सांस्कृतिक इतिहासाच्या दृष्टीने केलेली मांडणी शाहिरी आहे. त्यांचे ग्रंथलेखन, स्फुटलेखन या सर्वांमधूनच संतसाहित्याची समीक्षा अधिक समृद्ध झाली. मूलभूत संशोधनाचा पाया हे या समीक्षेचे बलस्थान असल्याने संशोधन व समीक्षा एकमेकांना पूरक ठरणारे घटक आहेत, याचे भान आणून देणारे हे समीक्षेतील वळण मानावे लागते.

डॉ. रा. चिं. ढेरे यांनी अखंड ज्ञानसाधना करीत निष्ठापूर्वक व व्रतस्थपणे केलेले संशोधन पुढील पिढ्यांना मार्गदर्शक ठरणारे आहे. मूलभूत संशोधनाबाबत त्यांचे इतिहासाचार्य राजवाडे यांच्याशी नाते जुळते. त्यांच्या द्रष्टेपणामुळे भक्तिवाङ्मय समीक्षेच्या कक्षा विस्तारत गेल्या. त्यातही संतसाहित्य आणि लोकसाहित्य हे त्यांच्या विशेष व्यासंगाचे विषय आहेत. संतांचा लोककल्याणाचा वसा, लोकसंस्कृतीची त्यांनी आत्मसात केलेली सामर्थ्ये, लोकसंवादासाठी लोकमाध्यमांचा त्यांनी पूर्ण ताकदीने केलेला अवलंब लक्षात घेऊनच डॉ. ढेरे यांनी आपला अभ्यास सिद्ध केला. 'संतांनी त्यांच्या जीवितकार्याचे साधन म्हणून लोकसाहित्याचे अध्यात्मीकरण केले आहे. म्हणजेच संतसाहित्य हे अध्यात्मीकृत लोकसाहित्यच आहे.' ही डॉ. ढेरे यांची भूमिका यांची भूमिका आहे. प्रामुख्याने महाराष्ट्राच्या धर्मजीवनाचा, समाजधारणांचा आणि सांस्कृतिक इतिहासाचा खोलवर शोध त्यांनी घेतला. ज्ञात नसणारी साधने प्रकाशात आणली. नवा अर्थ लावण्याचा सातत्याने प्रयत्न केला. याचा प्रत्यय त्यांच्या 'संतसाहित्य आणि लोकसाहित्य : काही अनुबंध' (१९७८) या ग्रंथात येतो. वस्तुतः वेळोवेळी लिहिलेल्या लेखांचे हे संकलन असले तरी त्याला लोकतत्त्वीय दृष्टीचे एकच एक अंतर्गत सूत्र असल्याने संतसाहित्याच्या समीक्षेची एक नवी दिशा या लेखनातून प्रकटते. भक्तिवाङ्मयाच्या समीक्षेला लोकसाहित्याची जोड देणारी त्यांची ही संस्कृती समीक्षा स्वतःचे वेगळेपण सिद्ध करणारी आहे. संतसाहित्याचा प्रतिगामी साहित्य म्हणून विचार सुरू झाल्याच्या काळातच लोकमानसासाठी हे साहित्य निर्माण झाले, याचे भान डॉ. ढेरे यांनी आणून दिले. या साहित्याच्या मूळ प्रयोजनाचा विचार करण्याची आवश्यकता त्यांच्या लेखनातून अधोरेखित झाली. बहुजन समाजाचे मन ज्या लोकसंस्कृतीशी संबंधित होते, त्याचे आणि संतसाहित्याचे असणारे आंतरिक अनुबंध उलगडण्याचा प्रयत्न डॉ. ढेरे यांच्या समीक्षेत अंतर्भूत झाला आहे. हा अनुबंध त्यांनी अनेकांगांनी उलगडला आहे.

संतसाहित्यातील नैतिकतेबरोबरच लोकधर्मीय श्रद्धांचा विचार डॉ. रा. चिं. ढेरे करतात. लोकोद्धाराची तळमळ असल्यामुळे लोकजीवनाचे सूक्ष्म निरीक्षण संतांनी केले होते. परमार्थिक दृष्टी असूनही संतांनी लोकांची अधिभौतिक दुःखे न्याहाळली. त्यातूनच लोकप्रचलित व लोकप्रिय माध्यमांचा संतांनी अवलंब केला. त्रैवर्षिकांना ज्ञानापासून वंचित करणाऱ्या संस्कृत भाषेला त्यांनी दूर लोटले तरी त्यातील सत्त्वांश मात्र त्यांनी नाकारला नाही. मात्र, देशी भाषांमधून आपले विचार मांडण्याची बंडखोरी संतांनी केली. देशी भाषांच्या पुरस्कारामुळे संत आणि लोक यांचा मिलाफ घडला, अशी निरीक्षणे डॉ. ढेरे यांच्या अभ्यासातून प्रत्ययाला येतात. भारुडांमधील बाह्यांश लौकिक पातळीवरचे, तर त्यातून प्रकटणारा विचार लोकसंस्कृतीमधील अनिष्ट गोष्टींचा

परिहार करणारा असतो याकडे डॉ. ढेरे यांनी लक्ष वेधलेले दिसते. इथे त्यांना संतसाहित्यातील व्यापक लोकतत्त्वाचे दर्शन घडते. त्यामुळेच संतांच्या विचारातील ग्रंथप्रामाण्यापेक्षा प्रतीतिप्रामाण्यावर संतांनी भर देऊन समाजाच्या शेवटच्या थरापर्यंत विचार पोचवला, असे अवलोकन त्यांनी मांडले. संतसाहित्यात आढळणारा व्यापक लोकतत्त्वाचा प्रभाव त्यांना महत्वाचा वाटतो. संतसाहित्यात समाविष्ट झालेल्या लोकप्रिय गोष्टींच्या समावेशामागे लोकजागरणाचा हेतू असल्याने डॉ. ढेरे यांना जाणवते. 'संतांचे भाष्यग्रंथ प्रवचनासारखे, कथाप्रबंध लोकाख्यानांसारखे आणि गीतसंभार लोकगीतसरणीचा आहे.'[२] असे त्यांचे प्रतिपादन आहे. संतसाहित्यातील लोकजीवनाचे आकलन केल्याशिवाय संतसाहित्याच्या अभ्यासाची पूर्ती होणार नाही, याचे दिग्दर्शन डॉ. ढेरे करतात. संतसाहित्याच्या अध्ययनाची अनेक नवी क्षितिजे दृष्टिक्षेपात आणण्यासाठी डॉ. ढेरे यांचे लेखन उपयुक्त ठरते. कळवळ्याने लोकांपर्यंत जाणारे, आपला भावानुभव व विचारानुभव लोकमाध्यमातून अभिव्यक्त करणारे, लोकांशी संवादी ठरणाऱ्या कथा-गाथा रचणारे, आपल्या विचारांचा प्रसार व्हावा म्हणून रचना करणारे हे संत होते, अशी डॉ. रा. चिं. ढेरे यांची संतसाहित्याची संकल्पना आहे. संतविरचित वाङ्मय, संतविषयक वाङ्मय आणि संतसंवादी वाङ्मय याला ते संतसाहित्य असे संबोधतात. मध्ययुगीन सांस्कृतिक इतिहासाचा आविष्कार म्हणून ते त्याकडे पाहतात; पण त्याच वेळी त्यातील आध्यात्मिक विचारधारेपाठीमागे असणारा सामाजिक आशय हा त्यांच्या चिंतनाचा विषय बनलेला दिसतो. संतसाहित्याच्या अभ्यासासाठी संतकालीन लोकजीवनाला ते प्राधान्य देतात. तत्कालीन लोकजीवनाचा अभ्यास त्यांना महत्त्वाचा वाटतो.

अभिजनांची परंपरा आणि लोकपरंपरा यांच्या परस्परसंबंधांचा अभ्यास सातत्याने मांडणारे संशोधक व विचारवंत म्हणून डॉ. ढेरे यांच्या लेखनाचा विचार करावा लागेल. खंडोबा (१९६१), मराठी लोकसंस्कृतीचे उपासक (१९६४), लोकसंस्कृतीची क्षितिजे (१९७१), मुरारी मल्ल विरचित बाळक्रीडा (१९७७), महाराष्ट्राचा देव्हारा (१९७८), लज्जागौरी (१९७८), संतसाहित्य आणि लोकसाहित्य : काही अनुबंध (१९७८), श्रीविठ्ठल : एक महासमन्वय (१९८४), लोक अणि अभिजन (१९९६) यांतून मराठी लोकसंस्कृतीचे दर्शन नव्या अंगाने डॉ. ढेरे यांनी घडविले आहे. देवताविज्ञानाची ज्ञानशाखाही त्यांच्या लेखनातून फुलली. दत्त संप्रदायाचा इतिहास (१९५८) अथवा अलीकडच्या काळातील तुळजाभवानी आणि करवीर निवासिनीच्या लेखनापर्यंत त्यांनी अव्याहतपणे केलेले संशोधन व लेखन बघितले तर ढेरे यांच्या चिंतन-मननाचा, विलक्षण दृष्टीचा आणि संशोधनपर लेखनाचा विस्तीर्ण पट दिसू लागतो. महाराष्ट्राच्या बहुमुखी संस्कृतीचे एवढे अव्याहत चिंतन करणारा लेखक क्वचितच आढळेल. एका विशिष्ट पंथ-संप्रदायावर डॉ. ढेरे यांनी लक्ष केंद्रित केले नाही. अनेकांगी दृष्टीने लेखन त्यांनी केलेले आहे. 'चक्रपाणी' मधून आढळणारी संशोधनदृष्टी, संतचरित्रातील लोकप्रतिभेचा कल्पनाबंध, संतसाहित्याचा दलित जाणिवांशी जुळणारा अनुबंध, गुरुगौरवामागील सामूहिक धारणा, पावित्र्य संकल्पनेचा उहापोह, वज्रसूचीचे प्राचीन वाङ्मयावर पडलेले पडसाद, नाममहती आणि लोकमानसशास्त्राचा अनुबंध, लोकगाथा परंपरेचे स्फुरण असणारे चोंभाचे उखाहरण, असे त्यांनी हाताळलेले विषय बघितले, की त्यांचा 'समग्रतेचा दृष्टिकोन' ध्यानात येतो. सांस्कृतिक प्रश्नांची उकल करणारा संशोधक हे त्यांचे खास वैशिष्ट्य मानावे लागेल. वारकरी, महानुभाव यांच्याबरोबरच नाथ, दत्त, लिंगायत, सूफि, नागेश, गाणपत्य याही संप्रदायांचा विचार त्यांच्या लेखनातून प्रकटला. ग्रंथलेखन आणि स्फुटलेखन यामधून सांस्कृतिक इतिहासाच्या मूलभूत मांडणीचा डॉ. ढेरे यांचा हा प्रयत्न मौलिक स्वरूपाचा आहे. महाराष्ट्राच्या धर्मजीवनाचा हा पट धुंडाळतानाच भारतीय संस्कृती व मराठीचा अनुबंध त्यांनी स्पष्ट केला. रोष आणि वादांना डॉ. ढेरे यांना सामोरे जावे लागले. उदाहरणार्थ सांगायचे तर 'लज्जागौरी'च्या लेखनामुळे देवीभक्तांचा रोष ओढवला. 'श्रीविठ्ठल : एक महासमन्वय' लिहिल्यानंतर मंदिर प्रशासनाशी वाद झाला. 'चक्रपाणी' लेखनाविषयी आक्षेप नोंदवले गेले. पण त्यांच्या लेखनाला संशोधनाचे भक्कम आधार असल्याने ते वादात अडकून बसले, असे झाले नाही.

डॉ. रा. चिं. ढेरे यांच्या लेखनाचा हा आवाका बघितल्यानंतर मराठीतील संतसाहित्याची कक्षा विस्तृत करणाऱ्या या संशोधकाविषयी आदर दुणावत जातो. अनेक प्रश्नांची उत्तरे देणारे हे संशोधन समीक्षालेखनाची उंची वाढविण्यास मदत करणारे ठरते. स्वातंत्र्योत्तर काळात डॉ. ढेरे यांच्याएवढे मूलभूत, संशोधननिष्ठ, विचारप्रवर्तक, चिंतनपर नवदृष्टीचा अवलंब करणारे लेखन क्वचितच कुणी केले असेल. विचारव्यूहाची मांडणी होताना संतसाहित्यावर आक्षेप घेण्याचे, त्याला प्रतिगामी ठरविण्याचे प्रमाण वाढले. तथापि, याच काळात आपल्या मूलगामी व पायाभूत संशोधनाच्या आधारे डॉ. ढेरे यांनी वेगळी मांडणी करून अभ्यासकांनाही

विचारप्रवृत्त केले. अखंड परिश्रम, नव्याचा ध्यास, क्वचित धक्कादायक पण वस्तुस्थितीचा निर्देश करणारी मांडणी यामुळे त्यांची समीक्षा अनन्यसाधारण ठरली. लोकसाहित्याशी संतसाहित्याचा असणारा अनुबंध उलगडणारी त्यांची मांडणी ही साठोत्तरी पर्वातील भक्तिवाङ्मयाच्या समीक्षेतील लक्षणीय कृती ठरते. ही अव्वल दर्जाची समीक्षा डॉ. ढेरे यांनी मराठीला देऊन मराठी माणसांना उपकृत केले आहे. डॉ. ढेरे हे प्रा. गं. बा. सरदार यांचेही वारसदार ठरतात. कारण समग्रतेचा पट कवेत घेणे व सामाजिक दृष्टीचा लेखनात अवलंब करणे या गोष्टी त्यांच्या लेखनातून सातत्याने प्रत्ययास आल्या. या अर्थाने संतसाहित्याचे केवळ संशोधक नव्हे, तर विलक्षण दृष्टीचे समीक्षक म्हणूननही डॉ. ढेरे यांचे स्थान अबाधित आहे. भक्तिवाङ्मयाचा व्यापक पट, अभिनिवेशरहित मांडणी, संशोधनावर आधारित निष्कर्ष, सातत्याने केलेले चिंतनगर्भ लेखन, मूळाचा शोध घेण्याची प्रवृत्ती, अनंत तपशिलांसह तर्कसंगत पद्धतीने विचारांची अभिव्यक्ती, अशा अनेक विशेषांनी युक्त असणारी डॉ. ढेरे यांची समीक्षा भक्तिवाङ्मय समीक्षेच्या क्षेत्रातील मोक्याचे ठिकाण आहे. डॉ. अशोक कामत यांनी ढेरे यांना 'अत्यंत आत्ममग्न आणि मेधावी माणूस' असे संबोधले आहे. पण याच आत्ममग्नतेतून समीक्षेच्या अनेक दिशाही किलकिल्या झाल्या. संतसाहित्य समीक्षेच्या कक्षा त्यांच्या लेखनामुळे केवळ विस्तारल्या नाहीत, तर त्यांनी ही समीक्षाच समृद्ध बनवली. भक्तिवाङ्मय समीक्षेच्या अनेकविध वाटा त्यामुळे प्रकाशात आल्या. या अर्थाने डॉ. रा. चिं. ढेरे हे संतसाहित्य समीक्षेतील 'पायोनियर' मानावे लागतील.

(प्रस्तुत लेखात उद्धृत केलेली विधाने 'संत, लोक आणि अभिजन' या ग्रंथातील प्रस्तावनेतून आणि 'संतसाहित्य आणि लोकसाहित्य : काही अनुबंध' (पृ. १६) यामधील आहेत.)

◆

**सतीश बडवे**
प्राध्यापक व विभागप्रमुख
मराठी भाषा व वाङ्मय विभाग,
डॉ. बा. आं. म. विद्यापीठ,
औरंगाबाद, पिन कोड ४३१००४
चलभाष : ९९५८९९७७९७





अनुक्रमणिका







समीक्षा

डॉ. द. ता. भोसले

# 'साहित्यचिंतन' : डॉ. अविनाश सांगोलेकरांचा वाचनीय समीक्षालेखसंग्रह

सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठाचे मराठी विभागप्रमुख, ज्येष्ठ साहित्यिक, समीक्षक, संशोधक डॉ. अविनाश सांगोलेकर ह्यांचा ३ मार्च २०१६ रोजी प्रकाशित झालेला 'साहित्यचिंतन' हा समीक्षा लेखसंग्रह मी नुकताच वाचून पूर्ण केला. ह्या संग्रहामध्ये एकूण ४१ लेख असून, त्यामधून डॉ. अविनाश सांगोलेकर ह्यांच्या समीक्षालेखनातील विषयांची विविधता आणि त्यातून व्यक्त झालेला व्यासंग मला प्रभावित करून गेला. संतसाहित्यापासून ते आज लिहित्या असणाऱ्या नवोदितांपर्यंत डॉ. अविनाश सांगोलेकरांच्या लेखणीने संचार केला आहे. नवे काही तरी आम्हा वाचकांच्या ओंजळीत ठेवले आहे. त्यांच्या काही उल्लेखनीय लेखांमधून विचारदर्शन घडते, काहींमधून व्यक्तिदर्शन घडते. तसेच 'माणदेशी साहित्यिकांना भुरळ घालणारा माणदेश' हा लेखही एक वेगळे दर्शन घडविणारा आहे.

डॉ. सांगोलेकर ह्यांच्या 'साहित्यचिंतन' ह्या समीक्षा लेखसंग्रहातील साऱ्या लेखनामधून मला तीन गोष्टी विशेषत्वाने जाणवल्या. त्यातील पहिली गोष्ट म्हणजे कोणतीही एकांगी भूमिका न घेता साहित्यकृतींच्या गाभ्यातील सत्त्वाचे आणि सामर्थ्याचे त्यांनी रसिकतेने दर्शन घडविले आहे. 'कलाकृतीच्या गाभ्यात असलेल्या तरल आणि अस्पष्ट अशा रूपवैशिष्ट्याचे रसिकतेने घडविलेले दर्शन म्हणजे समीक्षा' ही समीक्षेची व्याख्या ह्या लेखांमधून अधोरेखित केली आहे. म्हणून मला ही त्यांची भूमिका फार महत्त्वाची वाटते.

दुसरी गोष्ट म्हणजे मराठी सारस्वताला चांगले योगदान दिलेले असूनही जे लेखक पुरेसे परिचित नाहीत, ज्यांची योग्य अशी दखल घेतली गेलेली नाही, त्यांचे डॉ. अविनाश सांगोलेकर ह्यांनी घडविलेले दर्शन महत्त्वाचे आहे. डॉ. दु. का. संत, डॉ. बळवंत तुरंबेकर, ॲड. रावसाहेब शिंदे, चंद्रकांत स. साबळे, त्र्यं. शं. शेजवलकर, थोडेफार डॉ. र. बा. मंचरकरसुद्धा यादीत समाविष्ट करता येतील. मराठी रसिकता व आजचे वाचक कथा-कादंबऱ्यांना अधिकांशाने खांद्यावर घेऊन नाचतात, पण आयुष्यभर संशोधन, चिंतन आणि लेखन करणाऱ्या विचारवंतांना/अभ्यासकांना फारसे महत्त्व देत नाहीत. मराठीच्या समृद्धीसाठी ह्या मंडळींनी केलेले लेखन वाचकांसमोर आणून डॉ. सांगोलेकर ह्यांनी मराठी साहित्यातील समीक्षेच्या क्षेत्रात फार मोठी कामगिरी बजावली आहे. आणि तिसरी गोष्ट म्हणजे कसदार लेखन करूनही उपेक्षेच्या अंधारात सापडलेले जे नवोदित लेखक आहेत, त्यांनाही डॉ. सांगोलेकरांनी त्यांच्या 'साहित्यचिंतन' ह्या समीक्षा लेखसंग्रहात न्याय दिलेला आहे. त्यांनी समीक्षक म्हणून केलेली ही कामगिरी खरोखरच उल्लेखनीय व महत्त्वपूर्ण आहे. त्यांच्या समीक्षा लेखसंग्रहातील चर्चासत्रातील लेख तर मला विशेष मौलिक वाटले. उदा. लेख क्र. १ ते ५ आणि लेख क्र. १३, १६, १७, १९, २१, २२, २३, २५, २७, ३७, ३९ ह्या क्रमांकांचे लेख मला विशेष भावले. वि. स. खांडेकरांच्या 'क्रौंचवध' आणि 'अमृतवेल' ह्या दोन्ही कादंबऱ्यांचा डॉ. अविनाश सांगोलेकर ह्यांनी करून दिलेला परिचय वाचकांना नक्कीच मार्गदर्शक ठरणारा वाटतो. त्यांच्या समीक्षा लेखसंग्रहात निर्मितिमूल्यांच्या दृष्टीने प्रकाशकाकडून मात्र हेळसांड झालेली आढळते. त्यामुळे वाचकांचा थोडाफार गोंधळ उडेल; परंतु एकंदरीत पाहता डॉ. सांगोलेकर ह्यांनी वाचकांना एक दृष्टी निर्माण करून दिली, असेच म्हणावे लागेल.

एकूणच, डॉ. सांगोलेकर ह्यांचा 'साहित्यचिंतन' हा समीक्षा लेखसंग्रह वाचकाला चिंतन करायला लावणारा आहे. एक संदर्भग्रंथ म्हणूनही तो समीक्षकांना नवी दिशा देईल असे वाटते. ह्याबद्दल मी डॉ. सांगोलेकर ह्यांचे अगदी मनापासून अभिनंदन करू इच्छितो.

◆

**'साहित्यचिंतन',**
**डॉ. अविनाश सांगोलेकर,**
**कीर्ती प्रकाशन, औरंगाबाद,**
**पृष्ठे : १६८, मूल्य : रुपये २००/-**



अनुक्रमणिका





लेख

**प्रकाश पायगुडे**

# म.सा.प. पुणे शहर कार्यवृत्त नोंद

## (१ जून २०१६ ते ३१ ऑगस्ट २०१६)

**१. दि. १ जून २०१६ :– कृष्णमुकुंद ऊजळंबकर पुरस्कार प्रदान समारंभ –** 'मराठीतील स्त्रियांच्याकविता' या ग्रंथाच्या लेखिका प्रभा गणोरकर यांना मा. विद्या बाळ यांच्या हस्ते हा पुरस्कार प्रदान करण्यात आला. सुधीर ऊजळंबकर यांच्या जीवनकार्याची माहिती दिली. प्रा. सुजाता शेणई व प्रा. रुपाली शिंदे यांनी परिक्षकाचे काम पाहिले. ऊजळंबकर व गुजराथी कुटुंबिय खास उपस्थित होते. प्रा. मिलिंद जोशी यांनी प्रास्ताविक केले. प्रा. शेणई यांनी मनोगत व्यक्त केले. प्रभा गणोरकर व विद्या बाळ यांची समयोचित भाषणे झाली. कार्यवाह बंडा जोशी यांनी सूत्रसंचालन व कार्यवाह दीपक करंदीकर यांनी आभार मानले. व्यासपीठावर प्रकाश पायगुडे व सुनीताराजे पवार उपस्थित होते.

२. **दि. १३ जून २०१६ :- विशेष कार्यक्रम - आचार्य अत्रे स्मृतिदिन -** अत्र्यांच्या ४७ व्या स्मृतिदिनानिमित्त 'अत्रे नावाचे वादळ' हा विशेष कार्यक्रम सादर झाला. सादरकर्ते शैला मुकुंद, प्रज्ञा ओक, मधुरा गद्रे, दिलीप ओक हे कलावंत होते. संहिता लेखन प्रज्ञा ओक यांनी केले. कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी यांनी प्रास्ताविक केले. कार्यवाह दीपक करंदीकर यांनी आभार व सुत्रसंचालन केले. अत्र्यांच्या जीवनकार्यावर आधारीत हा कार्यक्रम होता.

३. **दि. १५ जून २०१६ :- कथासुगंध-** या शुभारंभाच्या नव्या उपक्रमात ज्येष्ठ कथाकार लेखक भारत सासणे यांच्या 'आप्पांचा कोट' आणि 'मनातला मोर' या दोन गाजलेल्या कथांचे अभिवाचन व स्वतः कथाकाराकडून या दोन्ही कथांमागची कथा वाचनानंतर सांगितली गेली. मराठी कथेच्या वटवृक्षास प्रतिकात्मक पाणी लेखकाच्या हस्ते घालून कार्यक्रमास प्रारंभ झाला. कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी यांनी स्वागत व प्रास्ताविक केले. मान्यवरांचा सत्कार प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे व कोषाध्यक्ष सुनीता राजे पवार यांनी केला. सूत्रसंचालन, सासणेंचा परिचय व अभिवाचकांचा परीचय, आभार प्रदर्शन कार्यवाह दीपक करंदीकर यांनी केले. महाराष्ट्र कल्चरल संस्थेच्या शुभांगी दामले यांच्या सहकारी असलेल्या हर्षद राजपाठक, यांनी कथांचे प्रभावी अभिवाचन केले. त्यानंतर भारत सासणे यांनी कथांमागची कथा मनोज्ञपणे ऊलगडून दाखविली. सौ. मिनाक्षी सासणे ह्यांची विशेष उपस्थिती लाभली होती.

४. **दि. २६ जून २०१६ :- विशेष कार्यक्रम -** जागतिक संगीत दिनाचे निमित्त साधून रवींद्रनाथ टागोर मराठी गीत संध्या' हा गायनाचा कार्यक्रम झाला. यात टागोरांच्या 'गीतांजली, व इतर काव्यसंग्रहांच्या डॉ. राम म्हैसाळकर यांनी केलेल्या मराठी भावानुवादावरून कीर्ती मराठे यांनी रचलेली व संगीत बद्ध केलेली स्वतः कीर्ती मराठे, अश्विनी फडके, सायली कडवेकर, नबोमिता बॅनर्जी, डॉ. विदुला सहस्त्रबुद्धे, सौरभ गोडबोले, कौशिक भिडे, शौनक जुवेकर, तन्मयी घोलप यांनी गीते सादर केली. नंदकुमार फौजदार व यश सोमण यांनी साथसंगत केली. स्वागत व प्रास्ताविक कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी यांनी केले. प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे व कोषाध्यक्ष सुनीताराजे पवार यांनी कलावंतांचा सत्कार केला. कार्यवाह उद्धव कानडे यांनी कलावंतांचा परिचय करून दिला. कार्यवाह दीपक करंदीकर यांनी सूत्रसंचालन व आभार प्रदर्शन केले.

५. **दि. ४ जुलै २०१६ :- विशेष कार्यक्रम -** थोर साहित्यिक गोपाळ नीलकंठ दांडेकर जन्म शताब्दी निमित्त प्राचार्य विजय देव यांचे 'दुर्गमय गोनिदा' या विषयावर व्याख्यान झाले. डॉ. वीणा देव यांची खास उपस्थिती होती. वक्त्यांचा परिचय कार्यवाह बंडा जोशी यांनी करून दिला व उभयंतांचे स्वागत प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे व कार्याध्यक्ष प्रा. मिर्लींद जोशी यांनी केले. प्रास्ताविक कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी व सूत्रसंचालन आणि आभार प्रदर्शन कार्यवाह दीपक करंदीकर यांनी केले.

६. **दि. ६ जुलै २०१६ :- विशेष कार्यक्रम -** प्रकाशक परिषदेवर निवडून आल्याबद्दल मसाप तर्फे मान्यवरांचा सत्कार करण्यात आला. अनिल कुलकर्णी, सुनीताराजे पवार, राठीवडेकर, अरूण जाखडे आदी मान्यवर उपस्थित होते व त्यांनी परिषदेचा सत्कार स्विकारला.

७. **दि. २० जून २०१६ :- विशेष उपक्रम -** 'लेखक तुमच्या भेटीला' या उपक्रमाद्वारे आपटे प्रशालेच्या विद्यार्थ्यांच्या भेटीला संवाद साधण्यासाठी डॉ. न. म. जोशी आले होते. या शुभारंभाच्या कार्यक्रमाचे प्रास्ताविक कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी यांनी कले. व्यासपीठावर प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे, कोषाध्यक्ष सुनीताराजे पवार, कार्यवाह प्रा .माधव राजगुरू



अनुक्रमणिका

प्रशालेच्या मुख्याध्यापिका डेव्हीड तेरेसा उपस्थित होते. कार्यवाह प्रा. राजगुरु यांनी प्रा .जोशींचा परिचय करून दिला. शाळेच्या शिक्षिकांनी आभार मानले.

**८. दि. १० जून २०१६ :- मसाप गप्पा** - या नव्या उपक्रमाअंतर्गत अखिल भारतीय मराठी साहित्य महामंडळाचे नवनियुक्त अध्यक्ष डॉ. श्रीपाद भालचंद्र जोशी यांच्याशी प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे यांनी संवाद साधला. स्वागत, सत्कार व प्रास्ताविक कार्याध्यक्ष प्रा .मिलिंद जोशी यांनी केले. कोषाध्यक्ष सुनीताराजे पवार यांनी आभार मानले व कार्यवाह वि.दा.पिंगळे यांनी सूत्रसंचालन केले.

**९. दि. ९ जुलै २०१६ :- डॉ. म. वि. गोखले पुरस्कृत कै. प्रा. शं. वा. उर्फ सोनोपंतमामा दांडेकर पुरस्कार प्रदान समारंभ** - 'भारतिय तत्वविचार' या शकुंतला आठवले यांच्या ग्रंथाला मा. विश्वस्त ऊल्हासदादा पवार यांच्या हस्ते हा पुरस्कार देण्यात आला.. प्रथम मामा दांडेकरांच्या प्रतिमेला पुष्पांजली वाहण्यात आली. ऊल्हासदादा पवार व आनंदिनी क्षीरसागर यांचे स्वागत करण्यात आले. नंतर निवड समिती सदस्य प्रा. गौरी भागवत व प्रा. विजय कारेकर यांचे स्वागत करण्यात आले. प्रास्ताविक कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी यांनी केले. नंतर पुरस्कार प्रदान सोहळा झाला. परीक्षक प्रा. विजय कारेकर यांनी ग्रंथनिवडीमागचा दृष्टीकोन विशद केला. पुरस्काराच्या मानकरी शकुंतला आठवले व प्रमुख पाहुणे मा. ऊल्हासदादा पवार यांनी आपले विचार मांडले. प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे यांनी आभार मानले. कोषाध्यक्ष सुनीताराजे पवार या व्यापीठावर उपस्थित होत्या. कार्यवाह बंडा जोशी यांनी सूत्रसंचालन केले.

**१०. दि. १३ जुलै २०१६ : - विशेष कार्यक्रम** - मसाप गप्पा– ज्येष्ठ लेखक डॉ. अनिल अवचट यांच्याशी मा. उमा कुलकर्णी यांनी संवाद साधला. स्वागत व प्रास्ताविक कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी यांनी केले. व्यासपीठावर प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे व कोषाध्यक्ष सुनीता राजे पवार उपस्थित होते. कार्यवाह उद्धव कानडे यांनी आभार मानले व कार्यवाह वि. दा. पिंगळे यांनी सूत्रसंचालन केले.

**११. दि. १७ जुलै २०१६ :- लोकशाहिर अण्णाभाऊ साठे स्मृतीदिन** - स्मृतीदिनाच्या पूर्वसंध्येला मसाप व सम्यक साहित्य परिषद यांच्या संयुक्त विद्यमाने आण्णा भाऊ साठे यांच्या तीन निवडक कथांचे अभिवाचन महाराष्ट्र कल्चरल सेंटरच्या हर्षद राजपाठक, सचीन जोशी व अमृता पटवर्धन यांनी प्रभावीपणे केले. तमाशा, जिन्हाळा व रामरावणयुद्ध या तीन कथा अभिवाचनासाठी निवडल्या होत्या. स्वागत व प्रास्ताविक कोषाध्यक्ष सुनीता राजे पवार यांनी केले. सम्यक साहित्य परिषदेतर्फे धर्मराज निमसरकर यांनी मनोगत व्यक्त केले. आभार प्रदर्शन व सूत्रसंचालन कार्यवाह दीपक करंदीकरं यांनी केले.

**१२. दि. १८ जुलै २०१६ : - विशेष कार्यक्रम** - श्रद्धा भक्ती मंडळ प्रस्तुत 'एकाजनार्दनी' हा भक्ती संगीताचा कार्यक्रम सादर झाला. या मंडळाचे संस्थापक कै. श्रीराम साठे यांच्या प्रतिमेला श्रद्धांजलीपर फुले वाहण्यात आली. साहिल पुंडलीक, रवींद्र काशीकर, सौ. अनुजा पंडीत, राजन चक्के या कलावंतांनी सहभाग घेतला. कार्याध्यक्ष मिलिंद जोशी कार्यवाह प्रमोद आडकर उपस्थित होते. कार्यवाह दीपक करंदीकर यांनी सूत्रसंचालन व आभार मानले.

**१३. दि. २० जुलै २०१६ :- विशेष उपक्रम** - एक कवी एक कवयित्री – प्रभा गणोरकर व वसंत आबाजी डहाके यांचे काव्यवाचन व दोघांचे मनोगत असा आगळा वेगळा नवा उपक्रम आयोजित केला गेला. उभयंता कवींशी प्रा. निलिमा गुंडी यांनी संवाद साधला. कार्यवाह उद्धव कानडे व कार्यवाह प्रमोद आडकर यांनी सूत्रसंचालन व आभार प्रदर्शन केले. प्रास्ताविक प्रा. मिलिंद जोशी यांनी केले. यावेळी प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे व कोषाध्यक्ष सुनीता राजे पवार उपस्थित होते.

**१४. दि. २१ जुलै २०१६ :- कै. वा. म. जोशी स्मृतिदिन व्याख्यान** - प्रा. व. बा. बोधे यांचे 'माझे कादंबरी लेखन' या विषयावर व्याख्यान झाले. स्वागत व प्रास्ताविक कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी यांनी केले. वक्त्यांचा सत्कार कोषाध्यक्ष सुनीताराजे पवार यांनी केला. कार्यवाह वि. दा. पिंगळे यांनी वक्त्यांचा परीचय करून दिला. कार्यवाह दीपक करंदीकर यांनी सूत्रसंचालन व आभार प्रदर्शन केले.

**१५. दि. २६ जुलै २०१६ :- विशेष उपक्रम** - 'लेखक तुमच्या भेटीला' या उपक्रमाचे दुसरे पुष्प बालकुमार साहित्य संमेलनाचे माजी अध्यक्ष राजीव तांबे यांनी पुण्यातील पेरुगेट भावेस्कुल (मुलांची शाळा) मध्ये गुंफले. त्यांनी विद्यार्थ्यात मिसळून जाऊन त्यांच्याशी संवाद साधला. प्रास्ताविक कार्याध्यक्ष मिलिंद जोशी यांनी केले. यावेळी व्यापीठावर शाळेचे मुख्याध्यापक अरनाळे, कोषाध्यक्ष सुनीताराजे पवार, समन्वयक कार्यवाह माधव राजगुरू, कार्यवाह दीपक करंदीकर व डॉ. सदानंद बोरसे उपस्थित होते. संस्कृती प्रकाशनाने खास विद्यार्थ्यांसाठी पुस्तक प्रदर्शन व विक्रीचा स्टॉल उभारला होता.

**१६. दि. १ ऑगस्ट २०१६ :- संत सावता माळी स्मृतीदीन** - मसापच्या ग्रंथातील ज्येष्ठ ग्रंथपाल सौ. शोभा कुलकर्णी यांनी स्थापन केलेल्या 'वैष्णवी भक्तीगीत मंडळाचा अभंग गायनाचा कार्यक्रम झाला. ग्रंथालयाचे कार्यवाह वि. दा. पिंगळे व कार्यवाह ॲड प्रमोद आडकर यांनी कलाकारांचे स्वागत केले. अभंग गायनात कुलकर्णी यांच्यासह ग्रंथालयातील मिनाक्षी केळकर स्मिता पिंवळे, मधुरा खिरे, आशा संत, कल्याणी सराफ, छाया करमरकर, सुवीता मोडक, पेटीसाथ– माधव खिरे व तबलासाथ प्रसाद भावे यांनी केली. कुलकर्णी यांनी सावता माळ्यांचे चरीत्र सांगत व त्यांचे काही अभंग सादर करत भजनात रंग भरला. कार्यवाह दीपक करंदीकर यांनी सूत्रसंचालन व आभारपद्रर्शन केले.

**१७. दि. ८ ऑगस्ट २०१६ :- विशेष उपक्रम-**

**कथासुगंध** - कथाकारात व ज्येष्ठ साहित्यिक ह. मो. मराठे यांच्या 'न्यूज स्टोरी' या कथेचे अभिवाचन महाराष्ट्र कल्चरल सेंटरचे प्रमोद काळे व सचीन जोशी यांनी केले. त्यानंतर स्वतः लेखक ह. मो. मराठे यांनी कथेमागची कथा ऊलगडून दाखविली. प्रास्ताविक कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी यांनी केले. स्वागत व सूत्रसंचालन वि. दा. पिंगळे यांनी केले. मराठेंचा सत्कार प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे यांनी केले. कोषाध्यक्ष सुनीताराजे पवार यांनी आभार मानले.

**१८. दि. ९ ऑगस्ट २०१६ :- विशेष कार्यक्रम - मराठीच्या प्राध्यापकांचा स्नेहमेळावा** - परिषदेच्या वतीने मराठीच्या प्राध्यापकांचा स्नेह मेळावा प्रथमच आयोजित केला गेल. त्यामुळे प्रतिसाद उत्तम मिळाला. ज्येष्ठ कवयित्री व मसापच्या संशोधन विभाग प्रमुख डॉ. अरुणा ढेरे यांनी प्रमुख मार्गदर्शक म्हणून आपली भूमिका मांडली. समन्वयक डॉ. संदीप सांगळे यांनी प्रास्ताविक केले. परिषदेचे कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी यांनी भूमिका स्पष्ट केली. प्राध्यापकांच्या वतीने सर्व मान्यवरांचा सत्कार झाला. डॉ. अविनाश जाधव, अनिल सहस्त्रबुद्धे, राजाभाऊ भेलुमे, राजेंद्र थोरात, डॉ. मृणालिनी गायकवाड इत्यादी प्राध्यापकांनी आपले मनोगत व्यक्त केले. सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठाचे अधिष्ठाता डॉ. मनोहर जाधव यांनीसुद्धा मनोगत व्यक्त केले. परिषदेने पुढाकार घेऊन मराठीच्या प्राध्यापकांचा स्नेहमेळावा घेतल्याबद्दल सर्वांनी संतोष व्यक्त केला. कोषाध्यक्ष सुनीताराजे पवार यांनी आभार मानले. प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे यांनी विचार प्रकट केले. समन्वयक डॉ. वर्षा तोडमल यांनी सूत्रसंचालन केले. या मेळाव्यास प्रमोद आडकर, माधव राजगुरू, वि. दा. पिंगळे, उद्धव कानडे, दीपक करंदीकर, समर्थ मराठी संस्थेचे अनिल गोरे, प्रा. अनुराधा सावंत, डॉ. वंदना जोशी इत्यादी मान्यवर उपस्थित होते.

**१९. दि. १० ऑगस्ट २०१६ :- डॉ. शकुंतला क्षीरसागर पुरस्कृत कै. वि. शं. रानडे स्मृतीपुरस्कार प्रदान समारंभ**- 'डॉक्टर मला सुंदर दिसायचंय' या पुस्तकाचे लेखक डॉ. नितीन ढेपे यांना डॉ. मधुसूदन झंवर यांच्या हस्ते पुरस्कार देण्यात आला. निवड समिती सदस्य डॉ. मनोज देशपांडे यांनी निवडी मागची भूमिका स्पष्ट केली. पुरस्काराच्या देणगीदार डॉ. शकुंतला क्षीरसागर खास उपस्थित होत्या. डॉ. नितीन ढेपे, डॉ. मधुसूदन झंवर, कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी यांची समयोचित भाषणे झाली. व्यासपीठावर प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे व कोषाध्यक्ष सुनीताराजे पवार उपस्थित होत्या. कार्यवाह बंडा जोशी व कार्यवाह दीपक करंदीकर यांनी सूत्रसंचालन व आभार प्रदर्शन केले.

**२०. दि. १७ ऑगस्ट २०१६ :- डॉ .गं. ना. जागळेकर स्मृती पुरस्कार** - डॉ. विलास खोले यांना डॉ. सदानंद मोरे यांच्या हस्ते जोगळेकर पुरस्कार प्रदान करण्यात आला. डॉ. रेखा इनामदार-साने यांनी डॉ. खोले यांचा परिचय करून दिला. प्रारंभी जोगळेकरांच्या प्रतिमेला मान्यवरांच्या हस्ते हार व फुले अर्पण करण्यात आली. पराग जोगळेकर यांनी मनोगत व्यक्त केले. प्रकाश पायगुडे, सुनीताराजे पवार व प्रमोद आडकर यांनी मान्यवरांचा सत्कार केला. प्रास्ताविक कार्याध्यक्ष प्रा. मिलींद जोशी यांनी केले. प्रा. डॉ. विलास खोले व डॉ. सदानंद मोरे यांची भाषणे झाली. डॉ. उज्ज्वला जोगळेकर व जोगळेकर कुटुंबिय उपस्थित होते. कार्यवाह बंडा जोशी यांनी सूत्रसंचालन व कार्यवाह दीपक करंदीकर यांनी आभार प्रदर्शन केले.

**२१. दि. १९ ऑगस्ट २०१६ :- विशेष उपक्रम - मसाप गप्पा**- मा. विद्या बाळ यांच्याशी व. बा. उत्पल यांनी संवाद साधला. प्रारंभी परीषदेचे कार्यालयीन कर्मचारी चंद्रशेखर केळकर व प्रमिला मखी (ज्योत्स्ना नांदर्गीकर यांच्या मातोश्री) यांना दोन मिनिट उभे राहून श्रद्धांजली अर्पण करण्यात आली. स्वागत व प्रास्ताविक कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी यांनी केले. सत्कार व आभार प्रदर्शन कोषाध्यक्ष सुनीता राजे पवार यांनी केले. सूत्रसंचालन कार्यवाह वि. दा. पिंगळे यांनी केले.

**२२. दि. २२ ऑगस्ट २०१६ :- विशेष उपक्रम** - 'लेखक तुमच्या भेटीला' या अंतर्गत पुण्यातील न्यू इंग्लीश स्कूल, टिळकरस्ता या शाळेच्या विद्यार्थ्यांबरोबर कवी प्रवीण दवणे यांनी संवाद साधला. प्रास्ताविक कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी यांनी केले. दवणे यांनी कविता व त्यामागील विचार विद्यार्थ्यांसमोर प्रकट केले. व्यासपीठावर शाळेचे मुख्याध्यापक नागेश मोने, कोषाध्यक्ष सुनीता राजे पवार, प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे, कार्यवाह माधव राजगुरू, कार्यवाह दीपक करंदीकर उपस्थित होते. शाळेच्या अध्यापकांनी सूत्रसंचालन व आभार मानले.

**२३. दि. २८ ऑगस्ट २०१६ :-** परिषदेची वार्षिक सर्वसाधारण सभा अध्यक्ष डॉ. रावसाहेब कसबे यांच्या अध्यक्षतेखाली पार पडली.

**२४. दि. ३१ ऑगस्ट २०१६ :- विशेष कार्यक्रम -** शिवाजी सावंत यांच्या ७६व्या जयंतीनिमित्त युगंधर सन्मान प्रदान कार्यक्रम – मृत्युंजयकार शिवाजी सावंत मित्र मंडळ आणि महाराष्ट्र साहित्य परिषद यांच्या संयुक्त विद्यमाने लेखक राजेंद्र खेर यांना डॉ. सरोजा भाटे यांच्या शुभहस्ते 'युगंधर' सन्मान प्रदान करण्यात आला. यानिमित्त आधुनिक काळातही ऐतिहासिक आणि पौराणिक विषयांवरील साहित्यकृतींकडे वाचकांचा ओढा जास्त का आहे? या विषयावरील झालेल्या परिसंवादात कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी, राजेंद्र खेर व डॉ. सरोजा भाटे यांनी सहभाग घेतला. पुरस्कार विजेत्याचे मनोगत राजेंद्र खेर व अध्यक्षीय समारोप डॉ. सरोजा भाटे यांनी केला. प्रास्ताविक जयराम देसाई यांनी केले. व्यासपीठावर रसिका राठीवडेकर उपस्थित होत्या. सूत्रसंचालन कार्यवाह वि.दा.पिंगळे व आभार प्रदर्शन कार्यवाह दीपक करंदीकर यांनी केले.

◆

## म.सा.प., पुणे जिल्हा कार्यवृत्त

१) म.सा.प., पुणे जिल्हातर्फे दिनांक ३०.४.२०१६ रोजी जिल्हास्तरीय कविसंमेलन घेण्यात आले. सदर संमेलन प्रतिभा महाविद्यालय, चिंचवड स्टेशन येथे झाले. सदर कार्यक्रमात प्रमुख पाहुणे म्हणून दीपक कुलकर्णी, डॉ. अविनाश वैद्य नागनाथ लोहारे, तर मान्यवरांमध्ये डॉ. राजेन्द्र कांकरिया, संभाजी बारणे व पुणे जिल्हा प्रतिनिधी राजन लाखे उपस्थित होते. पुणे जिल्ह्यातून एकूण ५२ कवींनी भाग घेतला, त्यापैकी तीन कवींना, प्रथम, द्वितीय व तृतीय क्रमांकाने गौरविण्यात आले.

२) दिनांक १० मे २०१६ रोजी म.सा.प., पुणे जिल्हातर्फे प्राधिकरणातील सावरकर भवन येथे 'समाज, साहित्य आणि महाराष्ट्र साहित्य परिषद' या विषयावर परिसंवाद आयोजित करण्यात आला. परिसंवादात म.सा.प.चे कार्याध्यक्ष मिलिंद जोशी, कोषाध्यक्ष- सुनीताराजे पवार, डॉ. राजेन्द्र कांकरिया, वि. दा. पिंगळे, डॉ. आनंद घाटुगडे यांनी सहभाग घेतला. या वेळी पुणे जिल्हा प्रतिनिधी डॉ. पुरुषोत्तम काळे, रावसाहेब पवार उपस्थित होते. पुणे जिल्हा प्रतिनिधी राजन लाखे यांनी प्रास्ताविक केले. श्रीकांत चौगुले व डॉ. श्रीकृष्ण जोशी यांनी सूत्रसंचालन केले.

३) बुधवार दिनांक २० जुलै २०१६ रोजी म.सा.प., पुणे जिल्हा व लोकमंगल को. ऑ. सो. लि. यांच्या संयुक्त विद्यमाने सतीश एक्झिक्युटिव्ह सभागृह, वाकड येथे कवी संमेलनाचे आयोजन करण्यात आले होते. कथाकार बबन पोतदार, संजय सिंगलवार, शिवा बागुल पाहुणे म्हणून उपस्थित होते; तर मान्यवरांमध्ये राजन लाखे, संचालक प्रदीप नागणे, बॉबी मेनन, सतीश साठे उपस्थित होते. सदर कार्यक्रमात प्रशांत झरे लिखित 'आत्मउद्धार' या पुस्तकाचे, तर मीना शेख यांच्या 'पंढरीचा राजा विठुहरी माझा' या ध्वनिफितीचे प्रकाशन झाले.

४) म.सा.प., पिं. चिं. शाखेचे सभासद, ज्येष्ठ बालसाहित्यिक डॉ. आनंद शंकर घाटुगडे यांचे १४ ऑगस्ट रोजी हृदयविकाराने निधन झाले. दिनांक २२ ऑगस्ट रोजी म.सा.प., पुणे जिल्हातर्फे श्रद्धांजली सभा घेण्यात आली. अनेक मान्यवरांनी सरांच्या कार्याबद्दल सरांनी दिलेल्या साहित्यातील योगदानाबद्दल आपले मौलिक विचार व्यक्त केले व भावपूर्ण श्रद्धांजली अर्पण केली.

◆

## म.सा.प., सोलापूर शाखा कार्यवृत्त

मसाप सोलापूर शाखेच्या अध्यक्षपदी डॉ. सुहास पुजारी, तर कार्याध्यक्षपदी बाबुराव मैंदर्गीकर यांची निवड :

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे अध्यक्ष योगिराज वाघमारे यांनी राजीनामा दिल्याने कार्यकारिणीच्या सभेत डॉ. सुहास पुजारी यांची अध्यक्षपदी निवड करण्यात आली. त्यांची कार्याध्यक्षपदाची जागा रिक्त झाल्याने त्या जागेवर प्रकाशक बाबुराव मैंदर्गीकर यांची कार्याध्यक्ष म्हणून निवड झाली. मैंदर्गीकर यांचे उपाध्यक्षपद रिक्त झाल्याने त्या पदावर सौ. निर्मला मठपती यांची निवड झाली.

या प्रसंगी कार्यवाह पद्माकर कुलकर्णी, कोषाध्यक्ष राजेंद्र भोसले, कार्यकारिणी सदस्य अरविंद जोशी, किशोर चंडक, माधव पवार, डॉ. श्रुती वडगबाळकर, मारुती कटकधोंड, बदीउज्जमा बिराजदार, वंदना कुलकर्णी, शोभना सागर, राजेंद्र कोठावळे, प्रेमचंद मेने अदि सदस्य उपस्थित होते.

वार्षिक सर्वसाधारण सभा :

महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा सोलापूरची सन - २०१४-१५ ची वार्षिक सर्वसाधारण सभा रविवार, दि. - २८ जून २०१५ रोजी डॉ. निर्मलकुमार फडकुले सभागृह, सोलापूर येथे आयोजित करण्यात आली होती. कार्याध्यक्ष बाबूराव मैंदर्गीकर यांनी प्रास्ताविकात संस्थेच्या वाटचालीची माहिती दिली. या वेळी कार्यवाह ॲड. जे. जे. कुलकर्णी यांनी मागील सभेचा इतिवृत्तान्त वाचून दाखवला. तो सभासदांच्या संमतीने कायम करण्यात आला. वर्षभरात झालेल्या विविध सांस्कृतिक कार्यक्रमांची माहिती सांगितली. कोषाध्यक्ष राजेंद्र भोसले यांनी सन २०१४-१५चा ताळेबंद, उत्पन्न-खर्च व सन १५-१६ च्या अंदाजपत्रकाचे वाचन केले. सन- १४-१५ या वर्षात नवीन झालेल्या सभासदांचे स्वागत केले. या सगळ्यास उपस्थित सदस्यांनी मान्यता दिली.

या वेळी संस्थेचे कार्यवाह पद्माकर कुलकर्णी यांना महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणेचा 'उत्कृष्ट कार्यकर्ता पुरस्कार' मिळाल्याप्रीत्यर्थ सत्कार करण्यात आला. डॉ. सुहास पुजारी यांनी वर्षभरात राबवलेल्या विविध उपक्रमांची माहिती व उपस्थित सर्व सदस्यांची सभागृहाला ओळख करून दिली. या वेळी उपाध्यक्षा सौ. निर्मला मठपती, कवी मारुती कटकधोंड, सौ. वंदना कुलकर्णी यांच्यासह अनेक सभासद उपस्थित होते.

◆

**प्रकाश पायगुडे,**
प्रमुख कार्यवाह, म.सा.प. पुणे

शब्दांकन : **दीपक करंदीकर**
कार्यवाह, म.सा.प. पुणे




सळसळत्या तरुणाईच्या सर्जनशीलतेला साद घालत महाराष्ट्र साहित्य परिषदेने अक्षरधारा आणि डेलिहंट यांच्या सहयोगाने महाविद्यालयीन विद्यार्थ्यांसाठी युवा मराठी ई-कथा स्पर्धेचे आयोजन केले आहे. ही स्पर्धा तंत्रज्ञानाच्या दृष्टीनेही वैशिष्ट्यपूर्ण असणार आहे. भारतीय भाषांमधील मोबाईल ई-बुक कवतरित आणि प्रकाशित करणारे 'डेलिहंट' या कथा महोत्सवाला तांत्रिक आधार देत ती जगभर पोचविणार आहेत. या स्पर्शेसाठीची पारितोषिके अक्षरधारा बुक गॅलरीच्या वतीने देण्यात येणार आहेत. या स्पर्धेची माहिती www. masapapune.org या संकेत स्थळावर उपलब्ध आहे. ही स्पर्धा केवळ महाविद्यालयीन विद्यार्थ्यांसाठी असून त्यासाठी कोणतेही शुल्क नाही. कथेला विषयाचे बंधन नाही. शब्दमर्यादा १००० ते ३००० शब्दांची आहे. कथा मराठी युनिकोड फॉन्टमध्ये टाईप करून masaparishad@gmail.com या ई-मेल पत्त्यावर पाठवायची आहे. फक्त ई-मेल द्वारा येणाऱ्या कथाच स्पर्धेसाठी ग्राह्य धरण्यात येणार आहेत. स्पर्धकांनी कथेसोबत संपूर्ण माहिती आणि महाविद्यालयीन ओळख पत्राची फोटो कॉपी पाठविणे जरूरीचे आहे.

स्पर्धेसाठी अ- प्रकाशित कथा पाठवायची असून अनुवादित कथा स्वीकारल्या जाणार नाहीत. विजेत्या तीन कथांना अनुक्रमे रु. ७०००/-, रु. ५०००/-, रु. ३०००/- पारितोषिके अक्षरधाराच्या वतीने देण्यात येणार आहेत. सर्वोत्तम ११ कथांचे ई-बुक मसाप आणि डेलिहंटच्या वतीने प्रकाशित करण्यात येणार आहे. अधिकाधिक महाविद्यालशीन विद्यार्थ्यांनी या कथा स्पर्धेत सहभागी व्हावे असे आवाहन मसापचे कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी, प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे, कोषाध्यक्ष सुनीताराजे पवार, डेलिहंटच्या अंजली देशमुख आणि अक्षरधाराचे रमेश राठिवडेकर यांनी केले आहे.

सर्वोत्तम कथांना भरघोस बक्षिसे!

कथा पाठवण्याची अंतिम तारीख १५ नोव्हेंबर २०१६

निवडक कथांचे ई-बुक!

**संपर्क : masaparishad@gmail.com**

स्पर्धा फक्त महाविद्यालयीन विद्यार्थ्यांसाठीच!

बुक-पोस्ट


प्रेषक

प्रमुख कार्यवाह,

**महाराष्ट्र साहित्य परिषद,**

टिळक रस्ता, पुणे - ४११ ०३०.

दूरभाष : ०२०-२४४७५९६३



Maharashtra Sahitya Patrika. Quarterly : September 2016

Registered with the Register of Newspaper for India under No. 6398/57

Book Pkt. Periodical Category



अनुक्रमणिका







